# प्रस्तावना

मराठी साहित्याची वाढ करण्यास पुरुष-लेखकांप्रमाणं अनेक स्त्री-लेखिकाहि पुढे सरसावत आहेत ही मोठया समाधानाची गोष्ट आहे. मराठी साहित्य अधिक प्रभावी व्हायचें असल्यास केवळ मनरंजन एवढाच हेतु पुढे ठेवून चालणार नाही; तर समाजाच्या जीवनाच्या निरनिराळ्या बाजूवर प्रकाश पाडून वस्तुस्थितीची खरी कल्पना करून द्यावयाचें आणि त्याबरोबरच समाजाच्या विचारांत इष्ट तो बदल घडवून आणण्याचें कामहि यापुढे साहित्याला केलें पाहिजे. अर्थात् समाजाचा महत्त्वाचा घटक जो स्त्रीवर्ग त्याच्या जीवनाची योग्य कल्पना आणून देणारें जेवढें वाङ्मय निर्माण होईल तेवढें हवेंच आहे; व हें काम स्त्रियांनीच केल्यास तें विशेष श्रेयस्कर होईल यात शंका नाही.

या दृष्टीने सौ. आनंदीबाई किर्लोस्कर याच्या प्रस्तुत लघुकथा-संग्रहाचें स्वागत उत्सुकतेने केलें जाईल अशी आशा आहे. या संग्रहांतील गोष्टी मनोरंजक तर आहेतच, पण त्यात रेखाटलेलें स्त्रीजीवनाचें प्रतिबिंबहि मार्मिक असल्याचें आढळून येईल. संग्रहाला "प्रतिबिंब" हें नांव एवढ्याचसाठी देण्यांत आलें आहे.

प्रस्तुत संग्रहांतील सर्व लघुकथा "स्त्री" मासिकांतून प्रकाशित झाल्या आहेत

**प्रकाशक**

# कथानुक्रमणिका

# अपुरें अभिनंदन

रोजच्याप्रमाणे आज सकाळी मी दवाखान्यांत यायला निघालो.

वाटेंत दंडवते– माझे एक स्नेही-- भेटले. " काय डॉक्टर, आपले बापूसाहेब निवडून आले अखेर ! तुम्हाला कळलं ना ? " त्यांनी विचारलें

" हो हां, कळलं म्हणजे ! काल दुपारीं निवडणुकीचा निकाल जाहीर होताच तारच आलीय् त्यांची मला. " मोठया अभिमानाने मी उत्तर दिलें.

" अस्सं का ! बाकी बरोबर आहे. तुम्ही अन् ते जीवश्चकंठश्च स्नेही. तेव्हा ही आनंदाची बातमी ते तुम्हाला तातडीनं कळवणारच. अहो, आनंद दुसऱ्याला सांगितला म्हणजे दसपट वाढतो म्हणतात. अन् त्यांतून तुमच्यासारख्या जानी दोस्ताला सांगण्यांत तर तो सहस्र-पट वाढत असावा. "

बोलतबोलत आम्ही दवाखान्यापर्यंत आलों. बोलण्याचा विषय अर्थात् बापूसाहेबांचं गुणवर्णन हाच होता.

बापूसाहेबांचा व माझा स्नेह तसा कांही फारसा जुना नव्हता. पांच वर्षांपूर्वी जेव्हा मी प्रथम श्रीपूरला प्रॅक्टिस करण्यासाठी आलों, तेव्हा त्यांची माझी प्रथम ओळख झाली. ते त्या वेळी बऱ्यापैकी बस्तान बसलेले एक वकील तर मी माझी डॉक्टरची पाटी नुकतीच टांगलेली.

पण पहिल्या भेटीत जी आमची मैत्री जमली ती पुढे वाढतच गेली आणि थोडक्याच अवधीत आम्ही जिवलग स्नेही बनलों.

रोज एकमेकांची भेट घेतल्याशिवाय आम्हांला चैन पडायचं नाही. आपलीं सारीं सुखदुःखें– अगदी पतिपत्नीचे प्रेमकलहसुद्धा दोघांनी मोकळ्या मनाने एकमेकांना सांगावेत.

वहिनी अन् आमची ही थट्टेने आमच्या या मैत्रीचा मत्सर-देखील करीत.

पुढे श्रीपूरला धंद्याचा नीट जम बसेना आणि जवळच्या संस्था-नांत माझ्या मेहुण्याच्या ओळखीने पुढे येण्याचा बराच संभव होता म्हणून मी श्रीपूर सोडून येथे आलों त्याला वर्ष होऊन गेलें होतें.

अशा प्रकारें आम्ही एकमेकांपासून दूर झालों असलों तरी आमच्यामधली गाढ मैत्री कायमच होती. आठवड्यांतून एकदोन पत्रें एकमेकांचीं एकमेकांना जात. महिन्या दोन महिन्यांनी एकमेकांच्या गाठी पडत. अगदी जवळच्या खेड्यावरच्या अशिलाच्या गुन्ह्याळावर जायचं असलें तरी बापूसाहेबांचं आमंत्रण मला नक्की ठेवलेलें असे अन् घरची म्हैस व्याली असली तर खरवस खायला बापूसाहेबांनी यावं अशी माझी इच्छा असे.

दोन गावांमध्ये अंतरहि सारं तीसबत्तीस मैलांचं होतं; अन् मोटार सर्व्हिस सुरू असल्यामुळे रस्ता तासाभराचा होता त्यामुळे आमच्या या इच्छा बहुतेक वेळां पूर्ण होत.

बापूसाहेबांच्या कर्तृत्वाबद्दल आणि त्यांच्या सार्वजनिक कार्याबद्दल मला सादर अभिमान वाटे आणि मी तो वेळोवेळीं माझ्या इतर मित्र-मंडळीत बोलूनहि दाखवीत असे.

श्रीपूरच्या म्युनिसिपालिटीच्या निवडणुकी चालू होत्या. गेलीं चार वर्षें बापूसाहेब म्युनिसिपालिटीचे सभासद होतेच; पण यंदा नगराध्यक्षाच्या जागेसाठी ते उभे राहिले होते. त्यांचा प्रतिस्पर्धी एक मातबर व सरकारी कृपेंतला व्यापारी होता, त्यामुळे आपल्या लोक-प्रियतेची खात्री असूनहि बापूसाहेबांना बरीच काळजी वाटत होती.

पण अखेर निवडणुकीचा निकाल लागून बापूसाहेब विजयी झाले' त्यांना झाला नसेल इतका आनंद मला झाला. पत्राने कळविण्याइतकाहि दम न निघून बापूसाहेबांनी मला तार केली याबद्दल मला किती अभि-मान वाटला! बापूसाहेबांना ओळखणाऱ्या माझ्या साऱ्या मित्रमंडळीना मीं ती आनंदाची बातमी सांगितली होती.

दवाखान्यांतील रोग्यांची गर्दी कमी झाल्यावर मी जवळ पडलेलीं वर्तमानपत्रें चाळूं लागलों. झाडून साऱ्या दैनिक पत्रांतून बापूसाहेबांचा फोटो आणि त्यांच्या गुणवर्णनपर माहिती आली होती.

दवाखाना बंद व्हायला अजून अर्धा तास अवकाश होता.

मला आठवण झाली.

काल बापूसाहेबांची तार आली तेव्हा टपालाची वेळ निघून गेली होती म्हणून जादा पैसे भरून मी तारेनेच त्यांचें अभिनंदन केलें होतें आणि मग सावकाश सविस्तर असें पत्र लिहायचें असें ठरविलें होतें.

आता अनायासें सवड होती म्हणून समोरच्या पॅडमधून तीनचार नोटपेपर्स काढून जवळ घेतले आणि लिहायला बसलों.

बापूसाहेबांना पत्र लिहायचें म्हणजे पाठपोट लिहूनहि एक कागद मला कधी पुरत नसे. आणि त्यांतून आजचें पत्र लिहितांना तर माझ्या

मनाला विलक्षण गुदगुल्या होत होत्या. विचारांनी डोक्यांत अशी गर्दी उडवून दिली होती, की त्यामुळे किती लिहूं व कसं लिहूं असं मला होऊन गेलं ! अखेरीस मी सुरवात केली--

" प्रिय बापूसाहेब,

" श्रीपूरच्या नगराध्यक्षाची माळ अखेर तुमच्या गळ्यात पडली हें ऐकून माझा आनंद गगनांत मावेनासा झाला आहे. हा आनंद व्यक्त करण्यास माझ्याजवळ पुरेसे शब्द नाहीत. तुमच्या यशाबद्दल मी तुमचं हार्दिक अभिनंदन तर करतोंच; पण त्याबरोबर मला हेंहि लिहिल्याखेरीज राहावत नाही, की हें यश केवळ योगायोगाने तुम्हांस मिळालं नाही; तर तुमच्या योग्यते-मुळे व अलौकिक गुणांमुळेच तें तुम्ही हस्तगत केलें आहे. खरो-खर बापूसाहेब, तुम्ही आमच्या समाजाचं एक भूषण आहां--"

मी आणखी पुढे काही लिहिणार तोंच माझ्या एकांताचा भंग झाला. मधला स्प्रिंगचा दरवाजा वाजला आणि तो उघडून एक पोऱ्या आंत आला.

असेल त्याचं वय बारातेरा वर्षांचं. त्याच्या अंगावरचे कपडे मळकट आणि ठिकठिकाणी फाटलेले होते. डोक्याचे केस वाटेल तसे वाढलेले होते. अनवाणी पायावर गुडघ्यापर्यंत धूळ उडालेली होती.

" काय रे ! काय हवं ? " मी जरा त्रासिकपणाने आणि डोळे वटारून त्याला विचारलें.

" डॉक्टरसाहेब, आमची बाओी जरा शीक हाय. तिला बगाया चला जरा. "

" कोण रे तुझी बाओी ? कुणाचा तू ? नांव काय तुझं ? " त्या पोराचा तो दरिद्री अवतार पाहून मीं त्याला अेकामागून अेक प्रश्न विचारले.

अन् त्या पोराने जी माहिती सांगितली तीवरून मला समजून आलें, की आजारी बाई एक वेश्या आहे आणि हा पोरगा त्या गल्लींतल्या हॉटेलांत कपबशा धुण्याचें काम करणारा एक पोऱ्या.

वेश्येच्या घरीं जायचें ? मला एकदम कसेंसेंच झालें ! डॉक्टर म्हणून इतर रोग्यांबरोबर कधी कोणी वेश्याहि माझ्याकडे येत; पण कोणाच्या घरीं जाण्याचा मला अजून प्रसंग आला नव्हता.

पण डॉक्टर म्हणून त्या मुलाबरोबर जाणें मला आता भागच होतें. शिवाय त्याला प्रश्न विचारून माझी फी भरपूर पदरांत पडेल अशी मीं खात्री करून घेतली होतीच म्हणा.

पोऱ्याने टांगा ठरवून आणला आणि आवश्यक तें साहित्य घेऊन मी निघालों.

प्रतिष्ठित लोक राहात तो गावाचा भाग मागें टाकून त्या मला अपरिचित असलेल्या वस्तींत टांगा शिरतांच मला कसें गुदमरल्यासारखें होऊं लागलें ! दिवसाची वेळ असल्यामुळे रस्त्यावर फारशी रहदारी नव्हती. कुठल्यातरी एका हॉटेलांत कांद्याची घाण सुटली होती. मधूनच एखादा मवाल्यासारखा इसम तंबाखूची पिचकारी टाकीत आणि एखाद्या लावणीची ओळ आपल्या भसाड्या आवाजांत गात चालला होता.

टांगा एका घरापाशी थांबतांच पोऱ्या उतरून पुढे झाला आणि मी जीव मुठींत धरून त्याच्या मागोमाग आंत गेलों. आजूबाजूच्या खिडक्यांतून आणि रस्त्यावरून अनेक डोळे माझ्याकडे आश्चर्याने पाहात आहेत असा मला भास झाला आणि मी अधिकच शरमलों.

पोऱ्याच्या मागून मी जात होतों. आंतल्या बाजूस कोणीतरी दोघी बायका कडाक्याने भांडून एकमेकीला शिवीगाळ करीत होत्या. एक काळी हिडिस चेहऱ्याची बाई दाताला मिश्री लावीत होती. मला पाहातांच ती वाटेंतून दूर झाली. माझ्या कपाळावर आठ्या पसरल्या.

तेवढ्यांत एका खोलीच्या दाराशी त्याने मला आणून सोडलें.

खोलीत इकडेतिकडे बराच केर, विड्यांची थोटकें, पानांची डेखें पडली होती मळकट कपड्यांच्या कुबट वासांत कसल्यातरी उग्र अत्तराचा वास मिसळावा असें वातावरण खोलीत पसरलें होतं पली-कडच्या बाजूस भिंतीला टेकून अमळ बसती अशी होऊन एक स्त्री पथारीवर पडली होती.

आणि मला आश्चर्य वाटण्यासारखी गोष्ट म्हणजे तिच्या हातात एक वर्तमानपत्र होतं !

मला पाहून तिने तें खाली टाकलें आणि क्षीण स्वरात पोऱ्याला म्हटलें, " गोंदू, डॉक्टरसाहेबांना खुर्ची दे."

मी हळूहळू प्रश्न विचारून तिच्या आजाराची माहिती काढून घेतली

उंचनिंच, अंगाने थोराड अशी ती रोगी बाई असावी पूर्वी, पण आता अनेक रोगांनी तिचें शरीर पोखरून निघालें होतं जराशीहि हालचाल करणें त्यामुळे तिला मोठें कष्टदायक होऊन बसलें होतं

आजाराची पाहिजे तेवढी हकीकत विचारल्यावर मी कागदावर औषधांचीं नावें लिहूं लागलों व तें करीत असतां इकडेतिकडे कांहीतरी बोलावें म्हणून मी म्हटलें,

" तुम्हाला वाचायला येतं वाटतं ? "

" हां. कां ? "

" कांही नाही. सहज ! मघाशी वर्तमानपत्र पाहिलं तुमच्या हातांत म्हणून विचारलं."

" हं, आज श्रीपूरच्या निवडणुकीची हकीकत आलीय् ना त्यांत, ती पाहात होतें. बापूसाहेब खेडकर आले ना निवडून ? फोटो आलाय्

की त्यांचा." बोलतांबोलतां तिने हाताने वर्तमानपत्र चाळवल्यासारखें केलें.

"हो! हो! मोठी चुरशीची होती निवडणूक. पण बापूसाहेबांनी जिंकली अखेर!" मी बोलून गेलों.

"वर्तमानपत्रांतून येत होत्या खऱ्या बातम्या दोन्ही पक्षांच्या"

मला मोठें आश्चर्य वाटलें! असल्या गलिच्छ जागेंत हलकट धंदा करणारी ती एक वेश्या अन् पांढरपेशा वर्गाच्या भारदस्त भाषेंत बोलू शकते! रोजची वर्तमानपत्रें वाचते!

"तुमचं शिक्षण बरंच झालेलं दिसतंय्?" मी कुतूहलाने प्रश्न केला.

"तसं कांही फारसं नाही. मराठी पांचवी पास झालें मी. अन् पुढं मात्र .."

बोलताना ती मध्येच थाबली.

"पुढं काय? थाबलांत कां?"

"कांही नाही. भान न राहून मागची थोडी हकीकत माझ्या तोंडांतून निघाली!"

"मागची म्हणजे कसली?"

"हें जिणं नशिबी येण्यापूर्वीची. पण जाऊं दे. तुमचा वेळ जातोय् उगीच! टांगा आणायला सांगतं."

पण माझी जिज्ञासा आता चांगलीच जागृत झाली होती. मीं म्हटलें, "होऊं दे उशीर. आता घरीच जायचंय् मला. पण तुमच्या बोलण्यासवरण्यावरनं माझ्या मनांत निराळाच तर्क आला आहे. तेव्हा तुम्हालाँ त्यांत अवघड वाटत नसेल तर तुमची पूर्वीची हकीकत ऐकण्याची माझी फार इच्छा आहे."

"अवघड काय वाटायचं त्यांत! पण पुष्कळ लांबलचक अन् कंटाळवाणी हकीकत आहे ती. करायचीय् काय तुम्हाला ऐकून!"

मंजुळाबाई– तिचं नांव– तोंडाने असें म्हणाली तरी तिच्या मनांत बरीच खळबळ उडाल्यासारखें दिसलें. आणि यांत नवल तरी काय! आजारी माणसाची केवळ शरीरप्रकृतीच क्षीण होत नाही तर त्याचें मनहि नाजुक व सहानुभूतीला हपापलेलें असतें. मंजुळाबाईचीहि तीच अवस्था झाली व ती तक्तपोशीकडे पाहात क्षीण आवाजांत म्हणाली, "बरं डॉक्टर, तुमची इतकी इच्छाच आहे तर मी सांगतें. ऐका हं–

"दहाबारा वर्षं झाली असतील त्या गोष्टीला, शनवारात भड-भड्यांच्या वाड्यांत होतों आम्ही पुण्याला.

"अप्पांना म्हणजे माझ्या वडिलांना म्युनिसिपालिटींत नोकरी होती. माझी पांचवीची परिक्षा झाली अन् आई वारली.

"घरांत लहानलहान दोनतीन भावंडं, त्यामुळं पुढं शाळेंत जाण्याचा विचार सोडून वडिलांच्या सांगण्याप्रमाणं मी घरी राहिलें.

"दुपारी वडील कचेरींत जात, मुलं जेवून शाळेंत जात, त्यामुळं मला एकटीला घरांत मुळीच करमेनासं होई.

"आमच्या वाड्यात आणखी दोनतीन बिऱ्हाडं होती; पण त्यांच्या मुलीबाळी दुपारीं शाळेंत जात. राहात त्या मोठ्या बायका; त्यांच्याशीं मी कितीसं बोलणार?

"कादंबऱ्या, गोष्टींची पुस्तकं वाचावी अन् कंटाळा आला म्हणजे गॅलरींत उभं राहून रस्त्यावरून जाणाऱ्यायेणाऱ्यांची मौज पाहावी असं चाललेलं असायचं माझं.

"आमच्या बिऱ्हाडाला लागूनच पलीकडे एकदोन खोल्यांचा ब्लॉक होता. त्यांत एक विद्यार्थी नुकताच राहायला आला होता. त्याची जाण्याची वाट आमच्या गॅलरींतून दारासमोरून होती.

"कॉलेजांत शेवटच्या वर्गांत होता तो. दुपारी अडीचतीन वाजतांच त्याचं कॉलेज सुटे अन् तो बिन्हाडीं येई.

"गॅलरींत मी पाठमोरी उभी असलें तर तो मर्यादेनं थबके अन् माझ्या लक्षांत त्याचं येणं आलं नाही तर म्हणे, 'जरा...वाट...'

"त्याचं बोलणं ऐकून मी झट्कन् बाजूला होऊन त्याला वाट करून देई.

"पुढंपुढं आम्ही एकमेकांकडे बुद्धिपुरस्सर पाहूं लागलों. दृष्टादृष्ट होतांच दोघांच्याहि चेहऱ्यांवर स्मित उमटूं लागलं.

"त्या दृष्टिभेटीचं मला इतकं आकर्षण उत्पन्न झालं, की अडीच वाजल्यापासून मी गॅलरीत येरझारा घालूं लागायची आणि एकदाचा तो माझ्यासमोरून येऊन गेला म्हणजे त्या दिवसाचा कार्यक्रम पूर्ण झाल्यासारखं मला वाटायचं.

"हळूहळू तो माझ्याशी बोलूं लागला. आमची ओळख वाढूं लागली.

"मला वाचनाचा अतिशय नाद. त्याच्याकडे कादंबऱ्या-गोष्टींचीं पुस्तकं असत. तीं मी हक्कानं उचलून नेई.

"तो आल्यावर त्याच्या आग्रहावरून मी त्याच्या खोलींत जाऊन बोलत बसूं लागलें. त्यानं कधी फुलं, वेणी आणून मला द्यावी. मींहि घरांत केलेला खाण्याचा पदार्थ त्याला दिल्याशिवाय खाऊं नये.

"तो तरुण, मींहि अल्लड, घरांत वडीलधारं कोणी नाही. या सगळ्या अनुकूल परिस्थितीचा व्हायचा तोच परिणाम झाला. सूचक बोलणं, साभिप्राय पाहाणं, सहेतुक स्पर्श करणं अशा क्रमाक्रमानं आमचीं मनं विचलित होत गेलीं. आम्ही दोघंहि पुरतीं वाहवलों.

"आपण वागतों तें बरोबर नव्हे असं एकटेपणीं मनाला वाटे. पण मोहाच्या क्षणीं मन आवरत नसे. पुढं वाड्यांत आमच्या हया

सलगीबद्दल चर्चा होऊं लागली. माझ्या वडिलांच्या कानांवरहि या गोष्टी गेल्या. त्यांनी मला विचारलं आणि मी बेडरपणानं हें सारं कुभांड असल्याचं सांगून टाकलं.

"वडिलांनी मला सांगितलं, 'कांही असलं तरी यापुढं त्याच्याशी बोलू नको.' पण ते कामावर निघून गेल्यावर पाठीमागं त्यांना डोळे होते थोडेच?

"अल्लड तारुण्यांतल्या कैफानं मी बेहोष झालें होतें. मला वाटे, आमचं दोघांचं अगदी स्वर्गीय.. अगदी कादंबऱ्यांतून वर्णन केलेलं असतं तस्सं ..प्रेम आहे. कुणाच्याहि बंधनाला आम्ही कां म्हणून जुमानायचं? इतरांच्या टीकेला तुच्छ लेखून अधिकच बेफामपणानं वागणं म्हणजे मोठा पराक्रम असं वाटत होतं त्या वेळी. 'उद्या त्याची परीक्षा झाली अन् आम्ही दोघांनी विवाहबद्ध होऊन संसार आरंभला म्हणजे कशी या कुटाळांची नाकं ठेचतील!' मी मनांत म्हणे. कारण आमचं तसं ठरलंच होतं मुळी!

"परीक्षा आटोपली अन् तो आपल्या गावीं जायला निघाला. किती व्याकुळतेनं आम्ही एकमेकांचा निरोप घेतला. गेल्यावर दररोज पत्र पाठविण्याचं त्यानं मला वचन दिलं.

"त्याप्रमाणं त्याचं पहिलं पोचल्याचं पत्रहि आलं; पण त्यानंतर...

"माझा जीव खालीवर होऊं लागला. मीं एकामागून एक पत्रं पाठवलीं; पण--- चार दिवस लोटले, आठवडा गेला, महिना झाला, उत्तर नाही!

"माझ्या अविचाराचा परिणाम मला चांगलाच भोवणार असं चिन्ह दिसूं लागलं. भीतीनं माझं मन हादरून गेलं. काय करावं मला कांही सुचेना!

" शेवटी अेक दिवस मी अगदी दीन होअून वडिलांना सारी हकीकत सांगितली. ते पुष्कळ रागावले. पण शेवटी त्यांनाच कांहीतरी तजवीज करणं भाग होतं त्यांनी ती तशी केली अन् मोठ्या प्रयासानं मी त्यांतून मुक्त झालें.

" इतके दिवस आपल्या लहान मुलांचं करायला घरात माणूस हवं म्हणून माझ्या लग्नाचा विचार त्यांनी लांबणीवर टाकला होता. पण आता त्यांनी जारीनं स्थळं पाहायला सुरवात केली.

" माझ्या आणि त्या विद्यार्थ्याच्या सलगीचं हं प्रकरण आसपास पुष्कळांच्या तोंडी झालं होतं. त्यामुळं माझ्या लग्नाचंहि कुठं जमेना! अप्पांनी प्रयत्न करून एखाद्या ठिकाणी जमवीत आणावं. पण इतक्यांत कुठून तरी त्या माणसाना ही बातमी लागावी आणि ठरत असलेलं फिसकटावं! मी तर या धक्क्यानं इतकी पिळून निघालें होतें, की विचारूं नका! वाड्यात तोंड काढायची सोय उरली नव्हती! सारी माणसं ऐकूं जाईल अशी उघड कुचेष्टा करीत. लहान भावंडांना यांतलं कांही कळत नव्हतं. तरीपण एकंदर प्रकरणामुळं ती गुदमरून गेल्यासारखी झाली होती.

" हा एकंदर प्रकार आणि अप्पांना होणारा त्रास पाहून मला फार वाईट वाटे. जीव द्यावा असंदेखील एखादे वेळी मनांत येई.

" बिजवर, तिजवर, दरिद्री, कुरूप, म्हातारे असे लग्नाच्या बाजारांत कमी किमतीचे नवरदेव अप्पांनी शोधून पाहिले. माझं मनहि आता कसल्या का होईना नवऱ्याशी आर्य पतिव्रतेप्रमाणं संसार करायला पश्चात्तापानं पोळून तयार झालं होतं.

" पुढं अप्पांनी दूरदूरची अशी स्थळं पाहायला सुरवात केली आणि त्यांच्या प्रयत्नाला यश येऊन वऱ्हाडांतल्या एका पहिल्या बायकोची तीन आणि दुसऱ्या बायकोची एक अशी चार मुलं असलेल्या अठ्ठेचाळीस वर्षांच्या गृहस्थानं माझं पाणिग्रहण केलं!

" आपांनी एकदाचा समाधानाचा निःश्वास टाकला अन् मींहि.

" लग्न झाल्यानंतर सहा महिने सुरळीत गेले. कादंबऱ्यांतून वाचलेलं प्रणयी संसाराचं रम्य चित्र मीं मनांतून साफ पुसून टाकलं होतं. धुणं-पाणी, सडा-रांगोळी करण्यांत देखील मला धन्यता वाटे.

" सावत्र मुलांना माझा ळळा लागला होता. माझ्या आनंदाला जी थोडी जागा होती ती या मुलांतच. माझ्याकडे माझ्या पतीचं बेताचंच लक्ष होतं. मला आढळून आलं, की त्यांचं वर्तन जरासं 'असंच' आहे.

" पहिल्या बायकोच्या पहिल्या बाळंतपणांत त्यांना हा बाहेरचा नाद लागला आणि पुढं बायकोची आजारपणं, बाळंतपणं आणि मधली विधुरावस्था यांत तो वाढतच गेला

" सध्यादेखील त्यांचं एक 'ठिकाण' होतं. गावांत लोकांना ही गोष्ट उघड माहीत होती; पण कुणाला त्याचं विशेष कांही वाटत नसे. रात्रीं-अपरात्रीं ते घराबाहेर असत. मलाहि त्याचं कांही वाटत नव्हतं. मला त्यांचं प्रेम नकोच होतं. कुणातरी पुरुषाची बायको म्हणून मला जगायचं होतं.

" पण इथंहि माझं दैव आड आलं. कुणा उपद्व्यापी माणसानं माझं पूर्वचरित्र त्यांना कळवायचं पुण्य संपादन केलं... आणि काय? भडका उडाला!!

" माझा आणि त्याबरोबरच माझ्या वडिलांचा नाही तसा उद्धार करून त्यांनी मला घरांतून बाहेर काढलं!

" मी पुष्कळ विनवणी केली; पण बटीक म्हणून देखील मला घरांत ठेवून घ्यायला ते तयार नव्हते!

" घराबाहेर पडल्यावर 'पुढं काय?' हा प्रश्न माझ्यापुढं उभा राहिला. एकदा वाटलं, पुन्हा वडिलांच्याकडे जावं. पण मागचे

दिवस आठवून त्यांची आणि माझ्या धाकट्या भावंडांची दुर्दशा व्हायला नको म्हणून मीं तो विचार मनांतून काढून टाकला.

" त्यानंतर मी किती ठिकाणी फिरलें, मोलमजुरी करून जगायचा प्रयत्न केला; पण स्त्रीच्या कष्टाचा, बुद्धीचा मोबदला घेऊन आमच्या समाजाचं समाधान होत नाही. तिच्या शीलाचं मोल घेतल्याशिवाय पूर्णाहुति होत नाही जणू काही !

" सगळ्या ठिकाणी मला हाच अनुभव आला. स्वयंपाकीण म्हणून राहिलं तर घरमालकानं आपली पापी नजर ठेवावी आणि उघडकीला आलं तर माझंच नांव बद्दू होऊन माझी नोकरी जावी असा प्रकार व्हायचा. डोंगरावरून एकदा दगड सुटला की तो अखेर दरींत येऊन थडकतो. स्त्रीची एकदा दुर्दशा सुरू झाली की शेवटच्या पायरीवर येऊन पोचायला फारसा वेळ लागत नाही अखेर या मार्गाचा अवलंब करावा लागला.

" दोन वर्षांपूर्वी एका म्हाताऱ्या साथीदारिणीच्याबरोबर मी या गावी आलें.. ती अजून इथंच आहे."

मंजुळाबाई बोलायची थांबली याचं मला किती वेळ भानच नव्हतं !

शून्यमनस्क होऊन मी बसलों होतों.

" आजपर्यंत कुणाला मीं ही हकीकत सांगितली नव्हती; पण आज तुम्हीं इतक्या कळकळीनं विचारलंत...खरोखर, एखादं ओझं उतरल्यासारखं हलकं वाटतंय् आता मला."

मीं जडपणाने तिच्याकडे पाहिलें. कृतज्ञभावाचे अश्रु तिच्या डोळ्यांत तरंगत होते.

समाधींतून सावध झाल्याप्रमाणे मीं थोडया वेळाने भानावर येऊन तिला विचारलें,

" अहो, पण खरंच त्या विद्यार्थ्याचं पुढं काय झालं हें कळलं नाही का तुम्हाला ? "

" हो, कळलं की ! पाहिलंदेखील मी नुकतंच त्याला. "

" कुठं ? कधी ? " मी उत्सुकतेने विचारलें.

मंजुळाबाई कांहीच बोलली नाही.

" गप्प कां राहिलांत ? सांगा ना ? "

" नको, कशाला उगीच ! "

" मंजुळाबाई, तुमच्या साऱ्या हकीकतीनं माझ्या मनाला एवढा चटका लावला आहे, की आता एवढी गोष्ट तुम्ही सांगितली नाहीत तर मला चैन पडायचं नाही, सारखी हुरहुर लागून राहील. ती हकीकत न सांगण्याजोगं कांही महत्त्वाचं कारण तर नाही ना ? "

" छे छे, तसं कांही नाही. तुमचा इतका आग्रह आहे तर सांगतेंच. या भागांत आल्यावर त्याचं नांव पुन्हा ऐकलं. आता ते मोठे झाले होते, सार्वजनिक कार्यकर्ते म्हणून आबालवृद्धांच्या तोंडीं त्याचं नांव झालं होतं.

" मला वाटलं, माझी चूक होत असेल. नांवांसारखीं पुष्कळ नांवं असतात. पण आज वर्तमानपत्रांत त्यांचा फोटो आलेला बघितला. "

मी एकदम दचकलों ! कोणाबद्दल ही बोलते आहे ? माझ्या... अन् ती कल्पना खरीच ठरली !

मंजुळाबाई पुढे सांगत होती– " अन् माझी खात्री झाली. तरीपण उरलासुरला संशय फेडून घेण्यासाठी मी माझ्याजवळ त्यांनी गावीं जाण्यापूर्वी आपल्या स्वाक्षरीनिशी दिलेला फोटो अजून ठेवला आहे तो काढून बघत होतें, इतक्यांत तुम्ही आलां. हा पाहा– "

तिने आपल्या अंथरुणाखालून एक लहानसा फोटो काढून माझ्या-पुढे टाकला.

माझें मस्तक सुन्न झालें ! तो फोटो बापूसाहेबांचाच होता व कोपऱ्यांत त्यांनी मला पूर्ण परिचित असलेल्या आपल्या हस्ताक्षरांत लिहिलें होतें– " तुझा विनायक ऊर्फ बापू. "

" जाऊं दे. तुम्हाला मीं फार त्रास दिला डॉक्टरसाहेब ! पण तुम्ही माझ्याबद्दल जी आस्था दाखवलीत ती मी कधी विसरणार नाही."

मी गप्प बसलेला पाहून तिने अंतःकरणपूर्वक माझे आभार मानले.

माझें कांही काम आता उरलें नव्हतं तिला पथ्यपाण्याबद्दल योग्य त्या सूचना देऊन मीं तिचा निरोप घेतला.

त्या बोळकंडीच्या रस्त्याने जातांनाहि माझें मन विषादाने अन् तिरस्काराने भरून गेलें होतें.

पण आता तो तिरस्कार मंजुळाबाई आणि तिच्यासारख्या त्या इतर बायका यांच्याबद्दल नव्हता तर विषमतेचा तराजू घेऊन एकाच अपराधाबद्दल अगदी परस्परविरुद्ध दोन निकाल देणाऱ्या दांभिक समाजा-बद्दल होता.

जेवणाची वेळ टळून गेली होती तरी गोंदूबरोबर मंजुळाबाईचें औषध पाठविण्यासाठी मला दवाखान्यांत जाणें अवश्य होतें.

आंत गेल्यावर माझें लक्ष टेबलावर अर्धवट लिहिलेल्या पत्राकडे गेलें. मघाशी मला आलेला मित्रप्रेमाचा उमाळा आता पार आटून गेला होता. यापुढे ओळहि अधिक लिहिणें मला शक्य नव्हतं. मी बाकीचे नोटपेपर उचलून ठेवले आणि त्या अपुऱ्या पत्रावर फक्त माझी सही केली व शिष्टाचार पूर्ण करण्यासाठी जातांजातां पोस्टाच्या पेटींत त्याला लोटून दिलें.



# वंचिता

दारांत पाऊल टाकतांच विसूभाऊ क्षणभर थबकून उभे राहिले. सगळीकडे सामसूम होती. हालत्या पाळण्याचा ' कर्र.. कर्र ' असा आवाज आणि त्याच्या साथीत ' तिन्हीसांजा झाल्या ' असें गोड गळ्यावर म्हटलेलें अंगाईगीत मात्र स्पष्ट ऐकूं येत होतें. विसूभाऊंच्या मुद्रेवर प्रथम विस्मयाची आणि लगेच समाधानाची छटा पसरली.

अलीकडे जवळजवळ दीड वर्षांत त्यांनी ऑफिसमधून घरी येतांच इतकी शांतता कधीच अनुभवली नव्हती. गेल्या वर्षभर बाळंतरोगाने अंथरुणाला खिळलेल्या त्यांच्या पत्नीने परलोकी प्रयाण केल्याला आता चार महिने होत आले होते. त्यामुळे त्यांच्या गृहराज्यांत भयंकर अंदाधुंदी माजून राहिली होती.

घरांत त्यांची आई, पांच वर्षांची गोदी, तीन वर्षांची मथी नी दीड वर्षाचा बाबू. आजीबाई म्हाताऱ्या झालेल्या, वयोमानाप्रमाणे डोळे, कान इत्यादि इंद्रियाना शिथिलता आलेली खरं म्हटलें तर त्यांचे ह स्वस्थ ' हरि, हरि ' म्हणत बसण्याचे दिवस. पण तरणी-ताठी सूनच अंथरुणाला खिळली तेव्हा त्यांचा निरुपाय झाला. त्या कशीबशी चूल संभाळीत. मुली तर काय, लहानच. त्यांचा कांहीच उपयोग होण्यासारखा नव्हता. उलट त्यांच्याच वेण्या, न्हाणी नी जेवणीं उरकतांना म्हातारीला नक्को होऊन जाई. धाकटा बाबू दोन महिन्यांपासून आईच्या अंगावरून तुटलेला म्हणून फारच अशक्त आणि रडवा झाला होता. यामुळे विसूभाऊंना घरी आल्यावर क्षणाचीहि विश्रांति न घेतां या गृहराज्याचा ताबा घ्यावा लागे.

म्हातारीचा त्रागा, पोरींचे हट्ट आणि बाबूचें रडणें या सर्व 'संसारसुखा'ला कंटाळून कुठेतरी पळून जावें असें त्यांना होऊन जाई.

या सर्व त्रासांतून सुटायला एकच मार्ग होता. तो म्हणजे पुन्हा लग्न करणें. पण एक तर सध्या चातुर्मास चालू होता अन् दुसरी गोष्ट म्हणजे विसूभाऊंचें वय जरी पस्तिशीच्या सुमारास असलें आणि त्यांची नोकरीहि बऱ्यापैकी असली तरी पहिलीं तीन मुलें असलेल्या या 'स्थळा'-वर मुलीच्या पालकांच्या उड्या कशा पडणार ? एकूण, सध्या तरी तो विचार बाजूलाच ठेवणें भाग होतें.

एक दिवशी विसूभाऊ असेच ऑफिसमधून येऊन चहाच्या तयारीला लागले होते. म्हातारीच्या खोकल्याने थोडीशी उचल केल्यामुळे संध्याकाळची चूलहि त्यांनाच सांभाळावयाची होती. इतक्यांत त्यांचे एक स्नेही बापूराव तेथे आले. विसूभाऊंनी त्यांनाहि एक कप दिला. इतक्यांत छोटा बाबू रडत उठला त्याची समजूत करून त्याला दूध पाजल्यावर विसूभाऊंना मित्राशीं बोलायला फावलें.

" बापू, मी आता कंटाळलों बुवा या त्रासाला ! एखादे वेळीं तर असं वाटतं, की म्हातारीला कुठंतरी तीर्थाच्या ठिकाणीं पोचती

करावी; या मुलांना कुठल्यातरी आश्रमांत नाहीतर एखाद्या मिशनच्या स्वाधीन करावं आणि चालतं व्हावं कुठंतरी. ”

“ अरे पण हो; विसू, तुझी सगळी परिस्थिति मला ठाऊक का नाही ? पण अशी डोक्यांत राख घालून काय होणार ? हं बघ, आज मी आलों आहे तुझ्याकडे तो तुला आज या त्रासांतून सुटण्याचा एक उपाय सुचवण्यासाठीच. बघ पटत असला तर ”

“ तो कोणता ? ” विसूभाऊंनी अधीरतेने विचारलें.

“ आमच्या हिची एक दूरदूरची बहीण आहे. बिचारीचं लग्न झालं आणि चार महिन्यांतच नवरा मेला. तेव्हापासून आठ वर्ष सासरच्या माणसांचे कष्ट केलेन्. पण हिच्यासारख्या धडधाकट जिवाला पोसायचं त्यांना ओझं वाटू लागलं दिवसेदिवस. परवा तर त्यांनी स्पष्टच सांगितलं तिला, की तूं आपली कुठंहि सोय पाहा म्हणून. माहेरचं असं कुणीच नाही तिला. तेव्हा शेवटी आमच्याकडे आली. पण मी तरी प्रपंचवाईक माणूस, काय करणार ? इतक्यांत तुझी अडचण लक्षांत आली माझ्या. बघ ठेवून घेत असलास तर. पोरगी मोठी कष्टाळु अन् सालस आहे. कांही कांऽहीहि बघावं लागायचं नाही तुला घरांत. ”

पुढं दोघां मित्रांचा विचार ठरून आदल्या दिवशीच यमुना त्यांच्याकडे राहायला आली होती.

विसूभाऊंनी कपडे काढले आणि माजघरांत येऊन आईच्या अंथरुणावर ते बसले.

“ काय आई, आता कसा आहे खोकला ? ”

“ बरा आहे अंमळ– ” म्हातारी कण्हत सांगू लागली. “ मघाशी सारखी ढास लागली तेव्हा या पोरीनं आल्याचा थोडा रस काढून खडीसाखर घालून दिलान् तेव्हा जरा बरं वाटलं. ”

इतक्यांत यमुना चहा घेऊन आली.

"आपण घेणार का थोडासा? म्हणजे बरं वाटेल?" तिने आजीबाईंना विचारलें. बोलतांना तिचा स्वर आर्जवी आणि वागणूक मर्यादशील होती.

आज कितीतरी दिवसांनी बाहेरून दमून आल्यावर आरामशीर बसून चहा पितांना विसूभाऊंना काय वाटलें असेल तें त्यांचें त्यांनाच ठाऊक!

चहा पितांना त्यांनी आजूबाजूला नजर टाकली. नेहमीचा पसारा आज व्यवस्थित आवरलेला दिसत होता.

"सुटलों एकदाचा!" अशा अर्थी एक निःश्वास टाकून ते उठले आणि आईला म्हणाले, "आई, आज जरासा बाहेर जाऊन येऊं का? कंटाळा आला आहे अगदी."

"ये बरं बाबा. या वर्षांत माझ्या बाळाचीं अगदी हाडं निघाली हो. जरादेखील विसावा मिळाला नाही. आज आहे ही मुलगी घरांत करील सारं. बाबू उठला तरीदेखील घेईल थोडा वेळ."

अशा प्रकारें विसूभाऊंच्या संसाराचा गाडा आता सुरळीत चालू होता.

आता सकाळी ते निजून उठले की चहा तयार असावयाचा, स्नानाला पाणी, धोतर चुणून ठेवलेलें, साडेदहाला व्यवस्थित जेवण, संध्याकाळी कामावरून आल्यावर भरपूर विश्रांति. सर्व कांही व्यवस्थित चाललें होतें. मुलांची तर त्यांना मुळीच काळजी राहिली नव्हती. बाबू इतका रडवा; पण यमुनेच्या जोपासनेमुळे आता अगदी गप्प असायचा. त्याला आता चांगलें बाळसं धरूं लागलें होतें. गोदी, सथी तर काय, काकूलाच– यमूला त्या काकू म्हणत– चिकटून असायच्या. आजीबाईदेखील यमूवर अगदी प्रसन्न असत. त्या नेहमी कळवळून म्हणायच्या, "कशी सोन्यासारखी पोर आहे; पण नशीब पाहा बिचारीचं!

नवरा असता तर अगदी थाटांत संसार करून दाखवला असतान् पण दैव खोटं त्याला काय करायचं!"

यमुनेचा आजवरच्या खडतर परिस्थितीत शिणलेला जीव दोन गोड शब्दांना भुकेला होता. तीहि या उसन्या संसारांत लौकरच अगदी रंगून गेली.

मार्गशीर्ष महिना उजाडला. वरसंशोधनाची मोहीम सुरू झाली. विसूभाऊ एक 'उमेदवार' होतेच! कित्येक वधूपित्यांना त्यांचें नांव सुचविलें जाई. पण पहिलीं तीन मुलें, त्यांत एक मुलगा आहे, हें कळतांच सर्वजण बिचकत. त्यांच्या स्नेहीमंडळींनी त्याच्याकरिता शक्य ती खटपट करून त्यांना 'चतुर्भुज' करायचें असा निश्चय केला होता. पण तो तडीस जाण्याचें चिन्ह दिसेना. विसूभाऊंचा आणि त्या-पेक्षाहि म्हातारीचा जीव अगदी अधीर झाला होता. रोज घरी येणाऱ्या विसूभाऊंच्या मित्राना ती विचारी, "नाही ना हो जमलं कुठं? एकदा माझ्या बाबाच्या डोक्यावर अक्षता पडल्या आणि सत्तेची सून घरांत आली म्हणजे काळजी राहिली नाही मला."

दुपारी दोन वाजण्याचा सुमार होता. त्या दिवशी रविवार असल्यामुळे जेवणाला थोडा उशीर झाला होता. यमुना काम आटोपून नुकतीच लवंडली होती जरा. तिचा कुठे डोळा लागतो न लागतो इत-क्यांत बाहेर कुणी 'विसूभाऊ' अशी हाक मारल्यामुळे ती जागी झाली.

बापूराव आले होते. विसूभाऊंची खोली माजघराला लागूनच असल्याने त्यांचें सर्व भाषण यमुनेला ऐकूं येत होतें.

"काय माणसं तरी आहेत पाहा!" बापूराव सांगू लागले. "या ठिकाणी अगदी जमेलसं वाटत होतं. मुलगी अगदी काळी, तिला कुणीच पसंत करीना, बाप अगदी कंटाळून गेला होता. तुझं स्थळ त्याला सुचविलं, तें पसंतहि पडलं; पण त्याला त्या गोविंदरावांचं ठिकाण कुणीं सांगितलं म्हणे काल. त्याचं वय आहे सुमारें पंचेचाळीस

पण मूलबाळ कांही नाही पहिलं, तेव्हा त्यानं तें आज नक्कीदेखील करून टाकलं. मुहूर्तदेखील धरला येत्या दशमीचा."

विसूभाऊ नुसतें 'हूं, हूं' करून ऐकत होते.

बापूराव पुढे म्हणाले, "विसू, तुला एक गोष्ट विचारूं?"

"विचार की."

नंतर बापूरावांनी हळूहळू कांहीतरी सांगितलें. त्यावर थोडा वेळ स्तब्ध राहून विसूभाऊ म्हणाले, "तूं म्हणतोस त्यांत वावगं कांही नाही. पण लोक काय म्हणतील?"

"काय म्हणतील लोक? तूं काय आता पहिल्याप्रथम ही गोष्ट करणार आहेस? कितीतरी आता अशी लग्न होतात."

"होय; पण त्यांना लोक नांवं ठेवतातच! आणि शिवाय आई घरांत आहे... तिला हें आवडेल का?"

"पुरे झालं तुझं! लोक कुणाला नांवं ठेवीत नाहीत? आणि आईचं तूं म्हणतोस; पण तिलासुद्धा समजावून सांगितलं तर ती 'नको' म्हणणार नाही यमूवर तर त्यांची मर्जी आहे अगदी. हीच यमू जर कुमारिका असती तर पहिल्याप्रथम त्यांनीच तुला ही गोष्ट सुचवली असती. आता आपण ती पटवून द्यायची, एवढंच."

"अरे, पण तिचा स्वतःचा विचार काय आहे तें ठाऊक आहे का तुला? आज चार महिने पाहातों आहे, वर डोळा करून देखील ती बघत नाही. तिला हें पटेल असं मला नाही वाटत. आणि तिला ही गोष्ट विचारायची तरी कुणीं अन् कशी?"

"त्याची नको तुला काळजी. असला विचार उघड तर राहोच पण मनांतसुद्धा आणायला भिईल अशी गरीब मुलगी आहे ती. पण आम्ही दोघांनी जर धीर दिला तर 'नाही' म्हणायची नाही अशी

कल्पना आहे माझी. बरं, पण तूं तयार आहेस ना? तिची संमति मिळवायचं काम माझं. अरे, तिच्यासारखी बायको मिळायला नशीब हवं."

"अशी घाई नको बुवा करूं! जरा दमानं घे ना."

हें सर्व भाषण यमुनेच्या कानी पडलें. नव्हे, तिच्या नांवाचा त्यात उल्लेख असल्यामुळे तिने तें मुद्दामच लक्ष देऊन ऐकलें आणि तिच्या मनात विलक्षण खळबळ सुरू झाली. आज चार महिने विसूभाऊंचें लग्न जमविण्याकरिता मित्रमंडळीची चाललेली खटपट आणि प्रत्येक वेळी होत असलेली निराशा याचा पाढा आजीबाईच्या तोंडून तिला ऐकायला मिळत असला आणि दर वेळी त्यांच्या तोंडावर तीहि त्याबद्दल खेद व्यक्त करीत असली तरी आपल्या अंतःकरणांत त्याबद्दल कां कोण जाणे सूक्ष्म असा आनंदच होत आहे असं तिला वाटे. नवी गृहिणी आल्यावर आपली गरज सरल्यामुळे आपलें आश्रयाचें ठिकाण अंतरेल ही भीति त्याच्या मुळाशी असेल कदाचित्. आज बापूरावाने सुचविलेला विचार मात्र तिच्या मनांत कधी आला नव्हता खास.

दुर्दैवाने तिची आणि संसाराची तोंडओळखदेखील होऊं दिली नव्हती. यामुळे तिच्या सर्व आशा, आकांक्षा अतृप्त राहाव्यात यांत नवल नव्हतें! पण या जन्मी आपल्या नशिबी संसारसुख नाही अशी मनाची समजूत करून ती आपलें दुःख विसरण्याचा प्रयत्न करी. पण आता बापूरावाचें बोलणे ऐकनांच तिच्या आजवर आवरून धरलेल्या मनोभावना वर उसळून आल्या. "खरंच, आपल्याला या जन्मी सुखी होणं शक्य आहे तर? पण समाज आपल्याला वर तोंड काढू देईल का? पण आज तरी समाजांत आपली अशी कोणती मोठी योग्यता आहे की पुढं ती नाहीशी होईल म्हणून आपण भ्यावं?" अशा तऱ्हेच्या उलटसुलट विचारांनी तिच्या मनांत गोंधळ उडून गेला.

अशा बावरलेल्या मनोवृत्तींत ती एक क्षण उभी आहे तोंच प्यायचें पाणी बाहेर घेऊन जायला म्हणून विसूभाऊ आंत आले. तिला

तेथे उभी असलेली पाहून हिने बाहेरचें बोलणें ऐकलें तर नाही, अशा शंकेने ते चमकल्यासारखे झाले आणि आपण त्यांचें बोलणें ऐकलें हें यांना समजलें तर नाही, अशा विचाराने यमुनाहि गोंधळल्यासारखी झाली !

त्या दिवसापासून यमुनेच्या वागणुकीत पुष्कळ फरक पडला. घरांत ती पूर्वीसारखीच मुकाट्याने आपला उद्योग करीत असली तरी पहिल्या तिच्या उदास, निरुत्साही वर्तनांत आता खेळकरपणा दिसू लागला. अगदी नकळत पण तिच्या वेषभूषेंत पहिल्यापेक्षा नीटनेटके-पणा आणि टापटीप दिसून येऊं लागली. विसूभाऊ जवळपास असले, की ती उगीचच बावरल्यासारखी व्हायची. विसूभाऊंच्या वृत्तीत देखील बदल झाला आहे असा तिला भास होई. नेहमीप्रमाणे घरी येणारे बापूराव, " काय यमूताई, ठीक चाललं आहे ना ? " असें विचारीत आंत आले, की आता ते आपल्याला " त्याबद्दल " कांही विचारणार नाहीत ना, असें वाटून तिच्या छातीत धडधडू लागे.

अशा मनाच्या संभ्रमित स्थितींत ती असतांना एके दिवशी तिला समजलें, की विसूभाऊंचें लग्न ठरलें.

मुलीच्या एका डोळ्यांत फूल पडल्यामुळे तिचें कुठेच जुळत नव्हतें. आपण तरी ही मुलगी पतकरावी की नाही याबद्दल घरांत बराच खल झाला. आणि आता जास्त चिकित्सा न करतां अनायासें चालून आलेलें ठिकाण नक्की करून टाकावें असा सर्व मित्रांनी आणि आजी-बाईंनी सल्ला दिला.

मुहूर्तहि जवळचाच धरला. लग्नाची तयारी जोरांत सुरू झाली.

आणि इकडे यमुनेच्या मनाची स्थिति ! पण हा विचार सुचणार कुणाला ?

" अरे विसू, ही यमुना आपल्या सासरी जाणार म्हणे पुन्हा ! तिच्या दिराचं पत्र आलंय् म्हणे. मी तिला म्हटलं दोन दिवसांवर लग्न आलेलं, आज इतके दिवस तू राहिलीस आमच्याइथं तशी

लग्न झाल्यावर जा. पण ती म्हणते, 'भाऊजींना राग येईल ताबडतोब नाही गेलें मी तर' मग मला वाटलं, तेंहि खरंच. ती घरची माणसं आहेत तिच्या. त्यांची मर्जी तिला संभाळायला हवी. आम्ही काय परकी माणसं."

आईचें हें बोलणें ऐकून विसूभाऊ चमकल्यासारखे झाले. "आता पुन्हा त्यांना कशी आठवण झाली? एक पत्र पाठवून कळवलं चार दिवसांनी येते म्हणून तर नाही का चालायचं?" असे कांहीतरी ते म्हणाले खरे; पण त्यांचा स्वर आणि मुद्रा ओशाळल्यासारखी दिसत होती.

यमुना जायला निघाली तेव्हा गोदी, मथी बाहेर गेल्या होत्या म्हणून बरें; नाहीतर त्यांनी एकच गोंधळ करून सोडला असता. झोपलेल्या बाबूचा एक मुका घेऊन आणि विसूभाऊंनी देऊं केलेले दहा रुपये 'मुलांना खाऊ म्हणून असूं देत' असें सांगून ती बाहेर पडली.

त्यानंतर दोन दिवसांनी त्याच वेळी विसूभाऊंचें 'शुभ मंगल' साजरें होत होतें. अंतःपट दूर होतांच वधूवरांनी एकमेकांच्या गळ्यांत माळा घातल्या. वाजंत्र्यांचा कडकडाट आणि जमलेल्या मंडळीना पानसुपारी देण्याची एकच घाई झाली.

पण इकडे यमुना?...कुणास ठाऊक पुढे तिचें काय झालें तें!



# निळी ओढणी

जवळजवळ साठ वर्षांचं वय असेल बायजाबाईचें. मूळची कणखर पण आता म्हातारपणामुळे जराशी वाकलेली अन् गलित झालेली तिची शरीरयष्टि; डोळे, कान, दात इत्यादि अवयवांना वयोमानाप्रमाणे शिथिलपणा आलेला; आवाज मात्र अगदी खणखणीत. ज्या दोनचार घरचीं कामें ती करीत असे, तिथल्या मंडळींची मर्जी असायची अगदी तिच्यावर. अन् कां नाही असणार ? काम स्वच्छ आरशासारखें, वागण्यांत अगदी निःस्पृह, कुणाच्या तनसडीलादेखील कधी हात लावायची नाही, अन् विश्वासू. कांही जरुरीचें काम असलें की बायजाबाईच्या अंगावर खुशाल घर टाकून जावें.

खरें म्हणजे तिला आता काम होत नव्हतें पहिल्यासारखें. मुन्सफांच्या वहिनी तिला म्हणतसुद्धा, " बायजाबाई, कशाला एवढीं चार

ठिकाणची कामं करतां आता ? मीच तुम्हाला रुपायाभर जास्त देतें. आमच्याइथलंच एवढं काय पडेल तें काम करीत जा दिवसभर "

" वयनीबाय, सगळं खरं तुमी म्हनतां तें. पण कसं करूं ! माजी चंद्री हाय ना, तिच्यासाठी मला कराया होवं हये कष्ट. तिची आई अन् बा असता तर कशाला माझ्यावर..." असं बोलतांना म्हातारीचा गळा दाटून येई अन् वहिनीहि निरुत्तर होऊन गप्प बसत.

अलीकडे तर म्हातारीने आणखी एक काम धरलें होतें नवीन. चंद्री– तिची लहानगी नात-- आता मराठी दुसरीत गेली होती. तिला पुस्तकं, पेन्सिली, शाई, अमुक नी तमुक-- सतरा भानगडी असायच्या तिच्या. तो खर्च भागायला नको का ?

म्हातारी सकाळी उठून भाकरीतुकडा करून कामाला जाई ती दुपारी एक वाजण्याच्या सुमारास परत येई. त्या वेळी चंद्री जेवून शाळेला गेलेली असायची. दोघींची गाठ संध्याकाळी जेवणाच्या वेळी पडायची. चंद्री त्या वेळी आपल्या शाळेंतल्या नाना प्रकारच्या गमती आजीला सांगायची. " आज बाईंनी तीन हिशेब सांगितले होते आजी अन् माझे तिनीच्या तिनी बरोबर आले. " " ठमीनं आज गणितं करून आणली नाहीत म्हणून तिला वर्गाच्या बाहेर उभं केलं तासभर." " सखूला सगळ्या मुली 'आजीबाई ' म्हणून चिडवतात. " वगैरे

कधी आपल्या 'अगाध विद्वत्ते'ने आजीस दिपवून टाकण्यासाठी ती तिला विचारी, " आजी, दिशा किती आहेत सांग पाहूं ? " " तरू कशाला म्हणतात ? " बायजाबाईला अर्थातच त्याची उत्तरं देतां यायची नाहीत. मग आजीच्या या अज्ञानाबद्दल खदखदून हसून चंद्री तिला मोठया ऐटींत सगळें समजावून सांगे. जेवण झाल्यावर 'अभ्यास' करायचा आहे, म्हणून चंद्री वह्यापुस्तकांचा पसारा मांडून बसली की म्हातारी तिच्याकडे कौतुकाने पाहात राही. आपली चिमुकली नात एवढया वयांतच 'धाडधाड ' वाचण्याइतकी शहाणी झालेली पाहून तिचें

मन समाधानानें अन् अभिमानानें भरून जाई. त्या भरांत दिवसभर केलेल्या कष्टांचा तिला विसर पडे. चट्कन् उठून भरल्या डोळ्यांनी चंद्रीच्या तोंडावरून हात फिरवून आपल्या कानशिलांवर बोटें मोडीत ती म्हणे, " एवढयाशा वयांत किती शाणी झालीय् माझी बाई ! माझी दिष्ट लागल बया तुला. " अन् पोरीचे हे गुण पाहयला तिची आई अन् बाप नाहीत असें याच वेळी तिच्या मनात येऊन तिचें अंतःकरण मागील आठवणींनी विव्हल होई.

त्या दिवशी संध्याकाळी चंद्रीनें एक नवीनच बातमी अन् त्या-बरोबर एक मागणीहि आजीला सांगितली. त्यांच्या शाळेचा विविध मौजांचा एक कार्यक्रम व्हायचा होता. त्यांत गौळणीचा नाच व्हायचा होता अन् चंद्रीला त्यांत घेतलेलें होतें.

" अन् आजी, बाईंनी सांगितलंय्, की सगळ्या मुलींनी सारखा पोषाख करायचा आहे निळा परकर, पोलका अन् निळीच ओढणी-आपापली प्रत्येकीनं घरीच शिवायची मग आजी, शिवशील ना मला परकर नी पोलका ? अन् ओढणीला जरीचे काठ लावायला सांगितलेत बाईंनी. केव्हा जायचं आजी बाजारांत मग कापड घ्यायला ? " चंद्रीचा आनंद जणू उतू चालला होता आपण नाचांत भाग घेणार या विचारानें.

" जाऊं हं बाळ कधी व्हायचंय् तुमचं हें नाटक ? "

" सत्तावीस तारखेला ! अजून पंधरा दिवस अवकाश आहे. तोंपर्यंत होईल की शिवून. "

आजीच्या कुशीत झोपल्यावरसुद्धा चंद्रीचं सारखें आपल्या त्या नाचासंबंधीचेंच बोलणें चाललें होतें. बायजाबाई तीनतीनदा तिला " आता पुरे, नीज पाहूं उगीच-- " असें म्हणून थोपटून निजवीत होती.

अखेर एकदा तिला झोप लागल्यावर तिच्या त्या झोपेंतहि हस-णाऱ्या गोड चेहऱ्याकडे पाहात बायजाबाई विचार करूं लागली—

उद्या कापड घेऊन पोरीचे कपडे शिवायला टाकायला पाहिजेत; नाहीतर चैन नाही पडू द्यायची तोंपर्यंत. पण पैसे... खरेंच, किती पैसे लागतील बरें ? परकर अन् पोलकें मिळून चार वार तरी कापड लागेल. अगदी हलकें चार आणे वाराचें कापड घेतलें, तरी रुपयाभर पाहिजे त्यालाच, अन् शिलाई बारा आणे. शिवाय ती पांघरायची ओढणी कसली म्हणते आहे तिला काय खर्च येईल ? दोन रुपये ? कुणास ठाऊक दोन रुपये पुरतील की नाही तें ! तरीसुद्धा चार रुपये खर्च आहे ! कुठून आणायचे हे ?

बायजाबाईने मनाशी विचार करून पाहिला. नुकतीच पहिली तारीख झाल्यामुळे तिचे कामाचे पैसे आले होते आणि त्यांपैकी बहुतेक खर्चूनहि गेले होते. दर महिन्याला कांहीतरी शिल्लक टाकायचीच असा निश्चय करूनहि तिला तो आजवर कधी पाळतां आला नव्हता. तिच्या अंगावरील नेसतें एकच लुगडें फाटून गेलें होतें. सरपणवाल्याचें दोन महिन्यांचें देणें राहिलें होतें. मोठया काटकसरीने या वेळी राखून ठेवलेले दोन रुपये दुकानदाराला मागील बाकीबद्दल देऊन पुढच्या महिन्याचें सामान आणायचें असा तिने मनाशी विचार केला होता.

पण आता चंद्रीचा हा नवीनच खर्च पुढे आला होता! आणि त्या दोन रुपयांवर तरी कुठे भागत होतें ? मग काय, तूं जाऊं नकोस नाचांत म्हणून चंद्रीला सांगायचें ? छे ! किती हिरमुसली होईल पोरगी, नाही ? कांहीतरी करून पोरीची हौस भागवली पाहिजे. आईबापावेगळें लेकरू. मला दोन कष्ट जास्त पडले तरी चालतील; पण तिच्या मनाला नाही दुखवायची मी. तिच्या हसऱ्या तोंडाकडे पाहून तर जगायचं आहे मला आता. बायजाबाईने कुशींत झोपलेल्या त्या बालिकेला अधिक बिलगून धरून तिचा गोड पापा घेतला.

दुसऱ्या दिवशी सकाळी उठल्यावरहि पैसे कोठून आणावे ह्याच विचार तिच्या मनांत घोळत होता. चोख काम बजावून रोख दाम

घ्यायचा अशा बाणेदारपणाने ती आजवर वागत आलेली होती. घरांत एखादे दिवशीं फोडणीला तेल नसलें तर तसेंच कालवण करील; पण कुणा-जवळ उसनें मागायची नाही. पैशासाठी कुणाजवळहि तोंड वेंगाडायचें तिच्या जिवावर आलें होतें. पण तिच्या लाडक्या नातोसाठी ही अप्रिय गोष्ट करायलाहि तो तयार झाली होती. सगळें काम आटोपतांच ती मुन्सफीणबाईजवळ गेली.

"वैनीबाय--" खाली मान घालून ओशाळल्यासारख्या स्वरांत ती म्हणाली, "गरज हाये थोडी."

आपलें काम आटोपतांच क्षणभरसुद्धा न थांबणारी बायजाबाई आज अशी घुटमळत असलेली पाहून आधीच त्यांना नवल वाटलें होतें, त्यांत तिच्या बोलण्याने भरच पडली. विस्मयाने तिच्याकडे पाहात त्या म्हणाल्या,

"कसली?"

"रुपये व्होवेत दोन"

वास्तविक बायजाबाईने मुन्सफीणबाईजवळ चार रुपये मागायचे असा विचार केला होता; म्हणजे तेवढयांत चंद्रीचा सगळा खर्च भागला असता. पण प्रत्यक्ष बोलतांना तिच्या मनावर आणि जिभेवर जणू कांही कसलेंतरी दडपण पडल्यासारखें झालें आणि तिने चाचरत दोन रुपये मागितले.

"कशाला हो?"

"नड हाय तशीच."

"बघतें बाई आता माझ्याजवळ आहेत का ते. तुम्हाला वाटत असेल इतके पैसे आमच्या घरांत येतात म्हणून; पण बारा वाटांनी

निघून जातात. 'नाही' म्हटलं तर तुम्हाला वाईट वाटेल; पण आमच्या-मागं आमचे खर्च असतात हें लक्षात घेत नाही तुम्ही."

मुन्सफीणबाईची ही सरबत्ती ऐकत बायजाबाई मुकाट्यानें उभी होती. तिच्या निःस्पृह, मानी मनाला त्यांचें तें 'व्यवहारी' बोलणें ऐकतांना किती यातना झाल्या असतील तें सांगतां येणार नाही!

तिला तशीच उभी राहिलेली पाहून मुन्सफीणबाई पुढे म्हणाल्या,

"आता उभ्या राहूं नका. बाकीचीं सगळी कामं आटोपून जायच्या वेळी पुन्हा येऊन जा. त्या वेळी बघून ठेवीन."

यावर 'बरं' असें खालच्या मानेने म्हणून बायजाबाई तिथून निघाली. मुन्सफीणबाईची वागणूक त्यांच्या दृष्टीनें व्यवहारीपणाची असेल कदाचित्; पण त्यांच्या शब्दांत, स्वरांत, मुद्रेंत जो अहंभाव आणि तुच्छता तिला दिसली त्यामुळे तिच्या स्वाभिमानाला धक्का बसला आणि तिला पुन्हा त्यांच्याकडे जावेंसें वाटेना. पण मग चंद्रीला काय वाटेल? त्या पोरीचा हिरमोड करायचा? छे! बायजाबाईने मन घट्ट केलें आणि सारीं कामें आटोपून परत येतांना ती पुन्हा मुन्सफीण-बाईच्या घरीं गेली.

ज्या दिवशी चंद्रीच्या शाळेंतला कार्यक्रम होता त्या दिवशीं तिची धांदल काय विचारावी! कार्यक्रम साडेआठला सुरू व्हायचा होता; पण चंद्री पांच वाजतांच घरांतून बाहेर पडली होती. निघतांना आजीला "तू ये हं--" असं तीनतीनदा बजावून सांगायला ती विसरली नाही.

अजमासाने आठ वाजायला आले असं वाटतांच बायजाबाई घरां-तून बाहेर पडली आणि थिएटरजवळ आली. कार्यक्रम शाळेच्या मदती-करिता तिकिटें लावून व्हायचा होता. तिकिटांच्या खिडकीपाशी गर्दी झालेली होती. तींतून वाट काढीत जाऊन बायजाबाईने शेवटच्या दराचें एक तिकीट काढलें आणि ती जागेवर जाऊन बसली. थिएटरां-तील गर्दी हळूहळू वाढत होती. निमंत्रित पाहुणे आणि प्रतिष्ठित




" तूं ये हं-" असें आजीला तीनतीनदां बजावून सांगायला चंद्री विसरली नाही.

समजली जाणारी गावांतील मंडळी यांचें स्वागत करून त्यांना योग्य त्या जागीं बसविण्यांत व्यवस्थापक मंडळी गुतलेली होती.

बराच वेळ झाला. बसूनबसून बायजाबाईला झोप येऊं लागली होती. तिच्या आजूबाजूला तिच्यासारख्याच अडाणी गरीब-गुरीब बायका बसल्या होत्या. कुणाची मुलें रडत होती. तिच्या चंद्रीच्या वयाच्या शाळेंत जाणाऱ्या कित्येक मुली एकमेकीत पुढे होणाऱ्या कार्यक्रमाविषयी वाटाघाट करीत होत्या. स्टेजच्या बाहेरच्या बाजूला होणाऱ्या कार्यक्रमांचा बोर्डावर अनुक्रम लिहिला होता. दोघीतिघी मुली वाचीत होत्या. " गौळणीचा नाच " हे त्यांपैकी एकीने उच्चार-लेले शब्द ऐकून बायजाबाई वळून तिच्याकडे पाहूं लागली.

" काय ग ! काय म्हणालीस मुली ? नाच केव्हा व्हायचा ? "

" अजून खूप अवकाश आहे. आधी स्वागतपद मग भाऊ-बीजेचा संवाद, मग गोफ, मग .."

पण त्या मुलीची ती लांबलचक यादी ऐकण्याची बायजाबाईला मुळीच उत्सुकता नव्हती. नाचाला अजून पुष्कळ अवकाश आहे हें समजल्यामुळे ती कंटाळून जडावलेल्या डोळ्यांनी परत इकडेतिकडे पाहूं लागली. साऱ्या दिवसाच्या श्रमांमुळे ती अगदी थकून गेलेली होती. घरीं येतांच जेवणखाण आटोपून थोड्याच वेळांत जमिनीला पाठ लागतांच घोरूं लागायचें, अशी तिची नित्याची सवय. आज आपल्या लाडक्या नातीचें कौतुक पाहाण्याच्या उत्सुकतेमुळे तिला आपल्या श्रमलेल्या देहाचा थोडा वेळ विसर पडला होता. पण आता त्याला पुष्कळ अवकाश आहे असें कळतांच ती कंटाळली. हळूहळू झोपेचा अंमल तिच्यावर चढू लागला अन् शेवटची घंटा होऊन पडदा वर गेला तेव्हा ती बसल्या ठिकाणीच झोपी गेली होती.

मधूनमधून टाळ्यांच्या कडकडाटामुळे ती दचकून जागी होऊन समोर पाहूं लागे अन् त्या शेजारच्या मुलीला विचारी, " नाच व्हायचा का ग आता सुरू मुली ? "

" नाही हो आजीबाई. अजून अवकाश आहे. पण मगापासनं विचारतां आहां तें नाचांत तुमचं कुणी आहे वाटतं ? "

" होय ग बया, माझी नात चंद्री हाय ना. आज महिनाभर नाचतीया नुस्ती. लई पोरीची तारांबळ. दिस असल्यापासून येऊन बसलीया हतं..."

नातीचं वर्णन करायचें म्हटल्यावर बायजाबाईच्या तोंडाला जोर चढल्याशिवाय कसा राहील ?

आरंभी कांही संवाद, गाणी वगैरे झाल्यावर मध्ये शाळेच्या अहवालाचें वाचन, समारंभाच्या अध्यक्षाचें भाषण, शाळेला मदत करणाऱ्या व्यक्तींचा गौरव वगैरे होऊन नंतर थोडेसे कार्यक्रम होते अन् त्यांतच प्रथम चंद्रीचा नाच होता. म्हणून अध्यक्षाच्या भाषणाला सुरवात होतांच बायजाबाईच्या शेजारच्या एका जाणत्या मुलीने तिला म्हटलें, "आजीबाई, आता एवढं या गृहस्थांचं बोलणं संपलं की नाचाला सुरवात होणार बरं ! "

तिचं तें बोलणें ऐकून बायजाबाईच्या डोळ्यांवरची झोप उडाली. ती आपल्या जागीं नीट सावरून बसली

अध्यक्ष भाषणाच्या अगदी ऐन रंगांत आले होते. त्या शिक्षण-संस्थेने चालविलेलें नमुनेदार कार्य, त्याची झालेली वाढ, चालकांचे परिश्रम इत्यादि सगळ्या गोष्टींचा गौरव, संस्थेला मदत करण्याची आवश्यकता वगैरे असल्या भाषणांत असणारे ठराविक मुद्देच त्यांच्या भाषणांत होते; पण आपल्या वक्तृत्वाचा प्रभाव दाखवून श्रोत्यांना दिपविण्याच्या भरांत ते इतके वाहवले की सांगतां सोय नाही ! कार्यक्रमाचे नियोजक बसल्या ठिकाणीं आता हें चऱ्हाट केव्हा संपतें व ठराविक वेळांत पुढचे कार्यक्रम कसे आटोपतात अशा काळजीने चुळबुळ करूं लागले. लोकहि कंटाळले; अन् बायजाबाई... तिला तर इतका राग आला होता ! चाललेल्या भाषणाचा कांहीहि बोध तिच्या अडाणी

मनाला होण्यासारखा नव्हता. त्यामुळे दर क्षणाला ती अधिकाधिक अधीर अन् अस्वस्थ होत होती.

अखेर एकदाचें भाषण संपवून अध्यक्षमहाराज खाली बसले. श्रोत्यांनी सुटकेचा एक निःश्वास टाकून त्या आनंदाप्रीत्यर्थ खूप जोराने टाळ्यांचा कडकडाट केला. पुढील कार्यक्रमाची प्रेक्षक उत्सुकतेने मार्गप्रतीक्षा करूं लागले. बायजाबाईची उत्सुकता तर कळसाला पोचलेली होती. मध्यंतरीची दोनचार मिनिटें चार तासांसारखी कंटाळवाणी वाटली तिला. इतक्यांत कार्यक्रमाच्या व्यवस्थापक मंडळीपैकी एकजण पुढे आले आणि त्यांनी सांगितलें, की आतापर्यंत वेळ अजमासाबाहेर झाल्यामुळे पुढील बरेच कार्मक्रम रहित करण्यांत आले आहेत. फक्त शेवटचा एक संवाद अन् राष्ट्रगीत होऊन कार्यक्रम समाप्त होईल.

"आजीबाई, तुमच्या नातीचा नाच होणार नाही आता."

"अं! काय म्हणालीस? कां नाही व्हायचा?" बायजाबाईनें विचारलें. निराशा अन् आश्चर्य यांच्या मिश्रणाने विलक्षण कंप सुटला होता तिच्या आवाजाला.

"आता त्या गृहस्थांनी नाही का सांगितलं, की वेळ फार झाला आहे म्हणून पुढचा सगळा कार्यक्रम रद्द केलाय्?"

"होय? मग नाही व्हायचा नाच आता?" हें विचारतांना किती व्याकुळ झाला होता तिचा जीव! अन् त्यावर 'नाही' असं त्या मुलीचं उत्तर ऐकून ती क्षणभर निश्चल होऊन बसून राहिली! तिचे डोळे पाण्याने भरून आले. गेला महिनाभर नाचासाठी चंद्रीच्या जिवाची चाललेली तारांबळ, तिचा उल्हास अन् हौस-- साऱ्याचा चुराडा होऊन गेला होता. अरेरे! किती हिरमुसली झाली असेल पोरगी आता! त्या एवढयाशा जिवाला ही निराशा सहन करणें शक्तीबाहेरचें काम

होतं. तिथे आता क्षणभरदेखील बसायची तयारी नव्हती बायजाबाईची. पण तिच्या साऱ्या शरिरांतलें अवसानच नाहीसं झाल्यासारखें झालें होतें. अशा स्थितीत कांही वेळ गेला. शेवटी ती उठली अन् हळूहळू थिएटरच्या दरवाजाजवळ आली. तेवढ्यांत तिला कोणींतरी हटकलें आणि म्हटलें,

"अहो, तुम्ही चंद्राच्या आजीच ना? तुम्हाला तिकडे आंतमधे बोलावताहेत बाई."

विस्मित मुद्रेने बायजाबाईनं त्या माणसाकडे पाहिलें आणि तिला ओळखू आलें, की हा शाळेचा शिपाई आहे. त्याच्या मागोमाग ती आंत गेली. निरनिराळे पोषाख केलेल्या कितीतरी मुलींचा घोळका तिथे जमलेला होता. ज्यांचे कार्यक्रम उरकून गेले होते त्या एकमेकींशीं हसत त्याबद्दलची चर्चा करीत होत्या आणि ज्यांचे कार्यक्रम रहित झाले होते त्या हिरमुसल्या होऊन एका बाजूला मुकाट्याने बसून राहिल्या होत्या.

तिथेंच चंद्रीहि मुसमुसत बसली होती. शाळेच्या बाई तिची समजूत करीत होत्या. बायजाबाईला त्या म्हणाल्या,

"आजीबाई, ही तुमची नात. घेऊन जा हिला. खुळीच आहे! हिच्याबरोबर बाकीच्या साऱ्या मुलींचं नाही का राह्यलं? पण त्या कुठं रडत नाहीत हिच्यासारख्या?"

बाईचें बोलणें बायजाबाईला थोडेंच पटण्यासारखें होतें! नातीच्या ज्या हौसेपायी सारी अडचण सोसून, अपमान गिळून, गाठचे पैसे तिने खर्चले होते, त्या हौसेचा असा विरस झाल्यामुळे तिला राग आल्यावांचून कसा राहील? चंद्रीला जवळ घेऊन ती म्हणाली, "रडूं नको माझी बाई ती. घरी चल अन् मलाच करून दाव तूं. या समद्या शाण्या लोकास्नी काय दखल असायची हाय माझ्यासारख्या म्हातारीच्या

मनाची अन् पोरीच्या हौसेची ! " असं म्हणत चंद्रीला हाताशीं धरून ती थिएटरच्या बाहेर पडली.

थिएटरबाहेरच्या झगझगीत प्रकाशांत चंद्रीच्या अंगावरची जरीच्या काटाची ओढणी चमकत होती अन् तिच्या सुकलेल्या चेहऱ्यावर ठिबकणारे अश्रु आपल्या जीर्ण पदराने पुसून बायजाबाई गद्गद आवाजांत " उगी चंद्रा" म्हणून समजूत घालीत होती

त्याच वेळी शाळेचे मुख्याध्यापक अध्यक्षाच्या महत्त्वपूर्ण अमोलिक भाषणाबद्दल त्यांचे आभार मानीत होते.

• • •

# ढासळलेली तटबंदी

समोरच्या भिंतीवर टांगलेल्या मोठ्या घड्याळाने पांच ठोके देतांच सर्वांनी सुटकेचा एक निःश्वास टाकला. टेबलावरील कागदपत्रें आणि अितर जिन्नस आंतील खणांत कोंबून त्याला कुलुपें लावीत एकापाठीमागून एक सर्वचजण उठले. मागच्या खुटीवर काढून ठेवलेला कोट अंगांत घालून उजव्या हातांत घेतलेली टोपी धूळ झटकण्यासाठी डाव्या तळहातावर फट्कन् आपटीत रमाकांत शेजारच्या कारकुनाला म्हणाला,

“ काय गुप्ते, एकदम घरीच का ? ”

“ होय. कां ? ”

“ कांही नाही; कंटाळा आला आहे, म्हटलं जाऊं जरा ‘ सुख-निवास ’मधे ! ”

" नको रे बुवा! सुखनिवासमधे गेलं म्हणजे रुपाया आठ आणे तरी खिशाला चट्टा बसायचा अन् शिवाय घरी मंडळी उगीच तिष्ठत बसतात! तुमचं ठीक आहे हो. सडेफटिंग आहांत! मागं ना कसली काळजी ना खर्च."

बोलतबोलत दोघेहि जिना उतरून रस्त्यावर आले होते. " खरंच कान्हेरे, मार्गशीर्ष जवळ आला आहे, आता घ्या ना एकदा उरकून. आम्हांला लाडू मिळू देत की! परवा ते देशपांडेदेखील विचारीत होते आपल्या मुलीबद्दल. फर्स्ट क्लास मुलगी आहे पाहा. देखणी, गाणंबजावणं, सायकलवर बसणं– सगळ्यांत पटाईत! इंग्रजी सद्धा यत्ता शिकलेली. पाहा. पण तुम्ही कांही थांगच लागू देत नाही कुणाला!"

एकेक वाक्य सावकाश उच्चारीत गुप्ते रमाकांताच्या चर्येवरचा त्यामुळे होणारा परिणाम न्याहाळीत होते. नेहमीप्रमाणे हा विषय निघतांच कपाळावर नापसंतीच्या आठया चढवून त्याने मुग्धता स्वीकारलेली पाहातांच आणखी जरा नेट धरून पाहावा या विचाराने त्याच्या खांद्यावर हात ठेवून जरा हालविल्यासारखें करीत ते म्हणाले, " काय म्हटलं मीं... आलं ना ध्यानांत?"

सवड सापडतांच पुनःपुन्हा हा विषय उकरून काढणाऱ्या गुप्त्यांचा रमाकांताला मनांतून राग येत असला तरी त्यांना तोडून बोलण्याचा त्याला धीर होत नसे. आताहि मनांतला राग गिळून तो वरकरणी हसतमुखाने त्यांना म्हणाला, " मग काय, तुम्ही नाहीच येत चहा घ्यायला? अहो, पैशाचं काय मोठंसं घेऊन बसलांत! माझ्या पाकिटांत आहेत की सध्या बरेच."

आपला विषय असा उडवून लावलेला पाहून गुप्त्यांना मनांतून हसूं आलें. पण ते कसले वस्ताद! हसतहसत उलट त्याला म्हणतात, " छे बुवा! तुमचे असले म्हणून काय झालं! आपल्याला असं उगीच

पैसे खर्च करणं आवडत नाही. आता तुम्ही हें लग्नाचं कांहीतरी निश्चित करीत असलां तर मग मात्र येतों. पाहा."

त्यांच्या मस्करीकडे दुर्लक्ष करून "बराय् तर, येतों मग मी–" असें म्हणत रमाकांत झटकला आणि बघतां बघतां समोरच्या सुख-निवास विश्रांतिगृहांत शिरला. त्याच्याकडे पाहात "वेडा पीर आहे झालं!" असें मनाशी म्हणत गुप्ते हसले व आपल्या वाटेला लागले.

गुप्त्याना टाळून रमाकांत सुखनिवासांत शिरला खरा; पण गुप्त्यांनी त्याच्या मनाला डिवचून उठवलेल्या विचारांच्या लाटा त्याला कशा टाळतां येणार?

त्याला नोकरीला लागून वर्ष दीड वर्ष होत आलें होतं

आपल्या मनमोकळ्या वागणुकीनें तो ऑफिसात इतर मंडळीना हवाहवासा वाटे. कोणत्यातरी सणावाराच्या निमित्तानें गुप्त्यांसारख्या स्नेहीमंडळीच्या घरी तो कांही वेळ चहापाण्याला आणि क्वचित् जेवणालाहि गेला होता. आपल्या स्नेह्यांच्या या पाहुणचाराची उलट फेड करण्यासाठी तोहि त्यांना हॉटेलमध्ये घेऊन जाई

त्याच्या गृहस्थितीची माहिती मात्र कोणासच नव्हती ' त्याला विचारलें तर तो उडवाउडवी करून वेळ मारून नेई. परंतु गेलें वर्षभर त्याला सडाफटिंग राहातांना पाहून मंडळींनी लग्नाबद्दल विचारणा सुरू केली. कांहींनी आपल्या स्नेह्यासोबत्यांच्या मुलीसाठी त्याच्याजवळ शब्द टाकून पाहिला. पण व्यर्थ! एरवी बोलका असलेला रमाकांत या मुद्यावर संभाषण येतांच मुका होई, अगर दुसरा कांहीतरी विषय काढून तें बोलणेंच उडवून लावी.

त्याच्या या विचित्र वागणुकीचं सर्वांना एक कोडंच होऊन बसलें होतं.

आंतल्या एका टेबलाजवळ बसून रमाकांताने पोऱ्याला ऑर्डर दिली आणि वेळ घालवण्यासाठी टेबलावर बोटाचा ताल धरीत त्याने

एक गाणें गुणगुणायला सुरवात केली. पण विचारांच्या ओघांत तें केव्हा बंद पडलें हें त्याला समजलेंहि नाही.

" खरंच, किती दिवस आपण हा लपंडाव चालू ठेवणार ? केव्हा तरी मंडळींना खरी हकीकत सांगायलाच हवी थोडीशी. पण मग या गुप्त्यासारखी चौकसखोर मंडळी तिकडून विचाराला लागायची, की बिऱ्हाड कां करीत नाही ? बायकोला कां आणीत नाही ?

" खरं म्हटलं तर करायच्या आहेत काय या लोकांना चांभार-चौकशा ! पण नाही ! बाकी त्यांना काय दोष द्यायचा ! परंपरेच्या चाकोरीतून डोळे बांधून चालणारी व्यवहारी माणसं आहेत ही ! पैशाची भाजी घेण्यापासून जन्माची जोडीदारीण मिळविण्यापर्यंतच्या साऱ्या गोष्टी एकाच मापानं मोजणार हे ! माणसाला भावना म्हणून कांही असतात. प्रेम, प्रीति म्हणून कांही चीज आहे, ही गोष्ट यांच्या गावीहि नाही ! जाऊं द्या झालं ! "

विचारांच्या गोंधळामुळे समोरच्या पदार्थांच्या रुचीकडेहि त्याचें लक्ष नव्हतें. सवयीमुळे एकेक घास तो तोंडांत घालीत होता इतकेंच. पुढयांतली प्लेट रिकामी होतांच आणखी कांही मागवण्याऐवजी त्याने चहाची ऑर्डर दिली आणि लौकरच तो हॉटेलबाहेर पडून रस्त्याला लागला पहिल्या चौकांत येतांच कुठे जावें हा प्रश्न त्याच्या मनासमोर उभा राहिला. " घरीं जाऊन तरी करायचं काय ? एकटं खोलीत बसून पलीकडच्या घरांतली मुलाची सूरसनई आणि त्यांच्या आईचा ताशा ऐकायचा ! छे ! पण जायचं तरी कुठं ? पांच वीस झालेत. सिनेमा सुरू व्हायला पाऊण तास अवकाश आहे. कुठं घालवायचा एवढा वेळ ? "

हो-ना करतां करतां अखेर त्याची पावलें घराच्याच दिशेला वळली.

खोलीचें कुलूप काढून त्याने खिडकीत ठेवलें, कोट-टोपी काढून ठेवली आणि गार पाण्याने तोंड धुवावें म्हणून तो आंत गेला. डोळ्यां-

वर, टाळूवर गार पाण्याचे हबके मारल्यावर त्याला जरा बरें वाटलें. खिळ्यावरच्या टॉवेलने तोंड पुशीत तो खिडकीशी उभा होता तेवढयांत त्याला खाली चौकांत कांहीतरी बोलणें ऐकूं आलें. त्याने कानोसा घेतला तों त्याचेंच नांव घेऊन कोणीतरी चौकशी करीत होतें म्हणून तो औत्सुक्याने पुढे दाराशी आला.

खालची गंगूताई कोणालाशी सांगत होती, “ रमाकांत कान्हेरे ना ? अिथं वरल्या मजल्यावर राहातात. इकडून दुसरी खोली...”

कोण आलें एवढं म्हणून रमाकांत मान उंचावून पाहातो तों जिन्यावरून एका हातांत ल्हानशी बॅग व दुसऱ्या हातांत पाण्याचा फिरकीचा तांब्या घेऊन एक तरुण स्त्री येतांना त्याला दिसली. तिची नजरानजर झाली मात्र ! रमाकांत बर्फासारखा थंडगार पडला ! काय बोलावें अगर कसें वागावें हेंच त्याला सुचेना !

त्या तरुणीने मात्र रमाकांताकडे बघून गालांतल्या गालांत जरा स्मित केल्यासारखें दिसलें आणि नंतर खाली बघून ती सरळ आंत शिरली. हातांतलें सामान खाली ठेवून ती पुन्हा एकदा खाली जाऊन वळकटी, करंडी वगैरे उरलेलें सामान घेऊन आली आणि नंतर एक निःश्वास टाकून कपाळावरचा घाम पुसूं लागली.

रमाकांत वेडयासारखा तिच्या साऱ्या हालचालीकडे पाहातच होता ! शेजारच्या खोल्यांतले चेहरे खिडक्यांतून कुतूहलाने बाहेर डोकावत होते. नर्मदाबाई आणि मैनामावशी तर उगीचच एकदोनदा त्याच्या खोलीवरून फेरी मारून गेल्या !

आश्चर्याचा पहिला झटका ओसरल्यावर रमाकांताला वस्तुस्थितीचें यथार्थ ज्ञान झालें. सुधेने— त्याच्या पत्नीने— त्याच्यावर मात केली होती !

मनांतून तो चिडला, संतापला ! दंडाला धरून तिला बाहेर घालवून द्यावें असेंहि एकदा त्याच्या मनांत आलें. पण त्याची नागर-

संस्कृति त्याला तसं करूं देईना! दार जरासं पुढे लोटून शेजारी-पाजारी सहसा ऐकूं जाणार नाही अशा दबलेल्या आवाजांत तो गुरगुरला, " याचा अर्थ काय? कळवल्याशिवाय इथं यायचं म्हणजे!..."

" कळवायचं काय त्यांत? आपल्याच घरी आपल्याच माणसाकडे जायला कुणाची परवानगी हवी थोडीच!" त्याच्याकडे न पाहातां पण शांतपणानें तिने उत्तर दिलें.

तिचा निश्चय आणि वादविवाद करण्याची तयारी पाहून तो थिजला व अधिक चिडलाहि!

पहिल्यापेक्षा आवाज जरा चढवून तो म्हणाला, " असली गळेपडूपणाचीं बोलणी मला नको आहेत. इथं या घरांत माझा मी स्वतंत्र आहें. माझ्या इच्छेविरुद्ध घरांत घुसण्याचा हा लुब्रेपणा मी चालवून घेणार नाही. मघाशी उगीच वाड्यांतल्या माणसांच्या देखत शोभा नको म्हणून मी गप्प बसलों. पण आत्ता बजावून सांगतों, की जर अधिक अपमान व्हायला नको असेल तर आल्या मार्गानं पहिल्या गाडीनं निघून जाण्यांतच शहाणपणा आहे."

सुधेने त्याच्या या बोलण्यावर कांही उत्तर दिलें नाही. आणलेलें सामान नीट व्यवस्थेने ठेवून तिने एक धुतलेलें पातळ-पोलकें काढून घेतलें आणि ती न्हाणीघरांत निघून गेली.

रमाकांत एका खुर्चीवर बसून विचार करूं लागला, " आता काय करावं! साध्यासुध्या दमानं कांही ही ब्याद निघून जाईल असं दिसत नाही. अगदी सोक्षमोक्ष करून घेण्याच्या निश्चयानं आलेली दिसते ही. हरकत नाही! पाहूं कुठवर धीर धरते .."

खोलींत अंधार पडत चालला होता. बटन दाबून त्याने दिवा लावला.

आणि त्याच वेळी नीटनेटकी केशभूषा केलेली सुस्नात अशी सुधा बाहेर आली.

दिव्याचा झगझगीत प्रकाश तिच्या चेहऱ्यावर आणि साऱ्या शरिरावर पडलेला होता. प्रवासाच्या श्रमानें मलिन झालेली तिची चर्या सकाळीं उमललेल्या मोगरीच्या फुलासारखी टवटवीत दिसत होती. काळीसावळी पण सतेज अंगकांति, पाणीदार डोळे, किंचित् आखूड पण सरळ नाक, निमुळत्या हनुवटीमुळे उभट दिसणारा चेहरा .. सुधा सुंदर नसली तरी आकर्षक होती खास. तांबडया काठाचें पांढरें-शुभ्र मलमली पातळ चोपून नेसल्यामुळे तिची लवचिक, सुडौल शरीर-यष्टि अधिकच उठावाने नजरेंत भरत होती.

रमाकांत स्तिमित होऊन तिच्याकडे पाहात होता. त्याला वाटलें, न्हाऊन तेलकट झालेले केस कपाळावर आलेले, कपाळी कुंक-वाचा टिळा अशी लग्नांत पाहिलेली ती सुधा हीच का? आता ही दिसते आहे अशी तेव्हा दिसली असती तर...... पण त्याचें मन परा-भव स्वीकारायला तयार नव्हतें. धावू पाहाणाऱ्या विचारांना प्रयत्नानें बांध घालीत त्याने कोट-टोपी घालून बाहेर जाण्याची तयारी दर्शविली.

"कुठं जायचं? जेवायला येणार ना परत?"

"माझा मी खाणावळीत जेवायला जाईन. ज्याचं त्यानं बघून घ्यावं!" त्याने तिरसटासारखें उत्तर दिलें.

आणि धाड्धाड् जिना उतरून तो खाली आला.

खाणावळीत जेवण झाल्यावर थोडा वेळ त्याने उगीचच इकडे-तिकडे भटकण्यांत घालविला. नंतर झोप येत होती तरी तो जव-ळच्या एका रद्दी चित्रपटाला गेला. एक वाजतां खेळ संपल्यावर मात्र त्याला घरी परतणें भागच होतें.

खोलींत प्रकाश दिसला, त्यावरून सुधा जागीच असावी असा त्याने तर्क केला. बिचारी... उपाशी असेल...! असेना! मला काय त्याचें!

त्याने दारावर टक्‌टक् केलें. लगेच दार उघडलें गेलें. कॉट-वरील त्याचा बिछाना घातलेला दिसत होता. पलीकडील भिंतीजवळ जमिनीवर आपलें अंथरूण पसरून सुधा त्यावर वाचत पडली असावी.

दाराला कडी लावून तिने उशागती पडलेलें पुस्तक मिटून टेबला-वर ठेवलें आणि विचारलें,

" दिवा मालवू ? "

रमाकांत कांहीच बोलला नाही. दिवा घालवून सुधा केव्हाच आपल्या अंथरुणावर जाऊन निजली होती.

तो मात्र त्या अंधारांत कितीतरी वेळ बिछान्यावर बसून राहिला होता ! अखेर कंटाळून जेव्हा आडवा झाला तेव्हा थोड्या वेळांत त्याला झोपहि लागली.

सकाळी तो जागा झाला तेव्हा बराच उशीर झाला होता ! स्टोव्हवर चहाचें आधण चढलेलें होतें आणि तोंडाने कांहीतरी गुण-गुणत सुधा पाठमोरी कपबशांची मांडामांड करण्यांत गुतली होती.

आपल्या काळ्याभोर विपुल केसांचा अैटदार पिळाचा अंबाडा घालून तिने त्यावर सोनचाफ्याचें एक सपर्ण फूल तिरपें खोवलें होतें.

नितळ मानेला विळखा घालून बसलेली सोन्याची नाजुक साखळी, अर्ध्या पाटीवर रुळणारा पदर, पांढऱ्यास्वच्छ रेशमी ब्लाउझच्या लांड्या बाह्यांतून दिसणारे मासल दंड . रमाकांत क्षणभर घोटाळून पाहात राहिला !

तोंड धुऊन तो बाहेर येतांच त्याच्यापुढे चहा आणि एका बशींत चिवडा-लाडू असे कांही फराळाचे जिन्नस आले. रात्रीचें जेवण जरा यथातथाच झाल्यामुळे त्याला भूकहि लागली होती. तेव्हा आधी चहा घ्यावा व मग सुधेला एकदा स्पष्ट विचारावें असा त्याने पोक्त विचार केला.




एकीकडे गाण्याची एखादी लकेर घेत केसांतून कंगवा फिरवतांना तो हळूच चोरून सुधेकडे पाही.

“ कोणत्या गाडीनं जाणार परत ? दुपारी एकला आहे ना एक गाडी ? ” मनाशी अनेक वाक्यांची जुळवाजुळव करून शेवटीं रमाकांताच्या तोंडून वरील शब्द बाहेर पडले.

सुधा संथपणाने कपांतल्या चहाचा घोट घेत होती.

सारा धीर आणि निश्चय एकवटून त्याने मनाची चांगली तयारी केली आणि तो म्हणाला,

“ मी काय म्हटलं तें समजलं ना ? आजच्या आज तुला परत गेलं पाहिजे. तसं जर तूं केलं नाहीस तर मीच इथून दुसरीकडे निघून जाईन. ”

“ मग मीहि तिकडे येईन. जिथं आपण तिथं मी. ”

“ चांडाळणी ! काय म्हणून तू माझा असा पाठपुरावा करते आहेस ? ” रमाकांत ओरडला.

“ उगाच संतापायचं काय म्हणून ? देवाब्राम्हणांच्या साक्षीनं आपण माझ्याशीं लग्न केलं आहे. ”

“ लग्नं देवाब्राम्हणांच्या साक्षीनं व्हायचीं नसतात ! दोन मनांची साक्ष लागते त्यांना. तशी साक्ष पटली होती का आपली ? लग्नापूर्वी ओळख तर राहोच; पण तोंडदेखील पाहयलं नव्हतं मीं तुझं ! ”

“ कां नाही पाहयलं ? बाबांनी दोनतीनदा विचारलं तर 'मुलाला मुलगी पाहयची कांही जरुरी नाही' असं सांगितलं आपल्या वडिलांनी. ”

“ कशाला पाहायची ? असं मिनिटा दोन मिनिटांत पाहायचं नाटक करून का कुठं एकमेकांच्या मनांची परीक्षा होत असते ? हें असं बाहुलाबाहुलीसारखं जुळवलेलं लग्न मला पसंत नाही असं बाबांना मीं तेव्हाच सांगितलं होतं. ”

“ मग उभे कां राहिलांत लग्नाला ? ”

" बाबांच्या त्राग्यामुळं. पण तेव्हाच निश्चय केला होता मी मनाशी, की असं कैचीत पकडून त्यांनी मला वाकवलं म्हणून काय झालं! ज्या मुलीवर माझं प्रेम नाही, जिच्या आचारविचारांशी माझी ओळख नाही तिला केवळ देवाब्राम्हणांनी पदरी बांधली म्हणून तिच्याशी संसार करायचा नाही! हें लग्न बाबांनी आपल्या हट्टानं घडवून आणलं आहे. त्याची जबाबदारी त्यांच्यावर! घडू दे त्यांना चांगली अद्दल!"

" त्यांना कसली अद्दल घडत आहे? हुंड्याचे बाराशे रुपये पचवून बसले आहेत की ते! आज दोन वर्षं व्हायला आली आपल्याला इथं नोकरीला लागून! मला घेऊन जाण्याबद्दल अनेक वेळां त्यांनी लिहून पाहिलं; पण कांहीतरी उडवाउडवी करून आपण त्यांना दाद दिली नाही! तरणीताठी उमेदवार सून अजून इथंच कशी म्हणून चौकशा करून गावातल्या लोकांनी जीव नकोसा केला तेव्हा कांहीतरी निमित्त करून त्यांनी माझी माहेरी रवानगी करून दिली. त्यांचा डाव माझ्या लक्षांत आला होता, पण मी मुद्दामच तसं दिसूं दिलं नाही. मनाशी विचार केला– आपलं भवितव्य आपणच आपल्या हातीं घेतलं पाहिजे. आईला सांगितलं मी आता इकडे येणार त्यापूर्वी तुम्हाला भेटायला आलें आहे. आईला आनंद झाला. तिनं मोठ्या हौसेनं माझी सारी तयारी करून दिली अन् मनाचा निश्चय करूनच मी इथं आलें आहे."

सुधा बोलत असतांना रमाकांत विस्मयाने तिच्याकडे पाहात होता. तिच्या डोळ्यांत स्वाभिमानाचें, करारीपणाचें विलक्षण पाणी चमकत होतें. बोलतांना तिच्या चर्येवर उद्वेग, राग, उपहास इत्यादि भावनांचें जें मनोहर नर्तन चालू होतें तें नुसतें बघतच राहावें असें त्याला वाटलें. त्याच्या मनांत आलें, आपल्याला वाटली तशी दैवाला दोष देत मुळुमुळु रडणारी आर्य स्त्री ही नाही तर!

त्यानें कितीहि मनाशी लपंडाव केला तरी तिच्या धैर्याचें, निश्चयाचें त्याला कौतुक वाटत होतें. तिच्या तेजस्वितेपुढे तो दिपून गेला होता !

पण गप्प राहून चालण्यासारखें नव्हतें. तिच्या बोलण्याला कांहीतरी उत्तर देणें भाग होतें.

" तुझ्या निश्चयाचा काय उपयोग ? अशा जुलुमानं का कुठं मनं मिळत असतात ! "

" मनं मिळालीं नाहीत तरी कर्तव्य टाळतां येत नाही ना ? तसंच पाहयलं तर माझं तरी तुमच्यावर कुठं प्रेम आहे ? दोघंहि एकमेकांना परकीच आहों. पण प्रेम नसलं म्हणजे वैरच असायला पाहिजे असं थोडंच आहे ? आपला प्रेमविषय सापडेपर्यंत प्रेमी म्हणून नसलं तरी मित्र म्हणून एकत्र राहयला काय हरकत आहे ? "

छे ! छे ! कमाल झाली हिच्या धीटपणाची ! पण खोटं तरी काय आहे तिचें बोलणें ? रमाकांत अगदी निरुत्तर झाला आणि तोंडाने कांहीतरी पुटपुटत तिथून उठून गेला.

नंतर त्यांचा दिनक्रम व्यवस्थित सुरू झाला रमाकांताने दाढी करून आंघोळ उरकली आणि बाजारांत जाऊन कांही अवश्य तो खरेदी केली. दहा वाजतां सुधेने त्याचें पान तयार केलें. पाटावर बसतांना तो म्हणाला,

" दोघंहि एकदमच बसूं या की ! तुझंहि पान घे. " तिने बिलकूल आढेवेढे न घेतां त्याची सूचना अमलांत आणली.

ऑफिसांत त्याचें आज कामावर लक्ष नव्हतें. राहूनराहून त्याच्या मनांत सुधेचें तें वाक्य घोळत होतें, " तसं पाहिलं तर माझं तरी तुमच्यावर कुठं प्रेम आहे ? " अगदी सरळ न् खरें होतें तिचें म्हणणें ! पण त्याने त्याच्या पुरुषी स्वाभिमानाला चांगलाच धक्का दिला होता.

दुसऱ्या कुणावर जडलेलें तर नाही तिचें मन ? तसें असेल तर...? पण काय झालें तसें असलें तर .. अंहं. त्याच्या मनाला या प्रश्नाचें समर्पक उत्तर देतां येईना ! तो अस्वस्थ झाला !

मनांतल्या या संशयाचें निराकरण करून घेण्यासाठी सुधेच्या अंतरंगाचा ठाव घेण्याचा त्याचा प्रयत्न सुरू झाला, तर एकीकडे तिच्या डोळयांत आपण भरावें म्हणून त्याचे प्रयत्न सुरू झाले. स्नान करून एकीकडे एखादी गाण्याची लकेर घेत केसांतून कंगवा फिरवतांना तो हळूच चोरून सुधेकडे पाही. पण तिचें त्याच्याकडे लक्षच नसे. ती फुलदाणींत फुलें बसवण्याच्या नाहीतर कपडयांच्या घडया घालण्याच्या उद्योगांत मग्न असे. त्याचें मन खट्टू होई आणि विचाराच्या जाळयांत तो अधिकाधिक गुरफटून जात असे.

शनिवारची संध्याकाळ झाली. सुधेला येऊन आज पांच दिवस झाले होते. या पांच दिवसांत सुधेकडे प्रतिक्षणी आपण अधिकाधिक आकर्षिले जात आहों याची त्याला जाणीव होती. तरीपण उसनी ऐट आणून बाह्यत: निर्विकार राहाण्याचें ढोंग तो करीतच होता ! त्याला मनांतून वाटे, सुधेने प्रथम आपला तटस्थपणा सोडावा, आपल्याशीं आर्जवाने, लडिवाळपणाने वागावें म्हणजे मग...

पण ती कसली वस्ताद ! जरुरीपुरतें बोलणेंचालणें, हास्यविनोद करीत असली तरी प्रणयभावनेची निसटती छटादेखील तिच्या चेहऱ्या-वर कधी उमटायची नाही !

आज ऑफिसांतून परत येतांना वाटेंत प्रभातचा ‘ माणूस ’ चित्रपट लागलेला पाहिला. त्याच्या मनांत आलें, सुधा नी आपण गेलों तर ..आणखी कितीतरी रम्य कल्पना त्याच्या तरुण हृदयाला आठवल्या ! पण...त्याचा अभिमान आड येत होता ना ?

रस्त्यांत वेण्या-फुलें विकणारा एक छोकरा त्याला आढळला. मोगरीच्या टपोऱ्या कळ्यांची मरव्याच्या हिरव्या पानांनी आणि कला-बतूने अधिकच शोभिवंत दिसणारी वेणी जाणाऱ्यायेणाऱ्यापुढे करून

तो म्हणत होता, " घ्या शेठ, शेलका माल आहे अगदी. दोन आण्यांना एक . "

खिशांतलें एक नाणें त्याच्या हातावर टाकून रमाकांताने ती वेणी विकत घेतली

सुधा आरशासमोर पाठमोरी उभी असेल तेव्हा हळूच मागून जाऊन ती तिच्या अंबाड्यावर बसवावी अशा कल्पनेचें मनोमय सुखहि त्याने उपभोगिलें मात्र जिना चढून खोलीत गेल्यावर चेहऱ्यावर शक्य तितकी बेफिकीरी आणून खिशांतील पुडा टेबलावर भिरकावीत तो म्हणाला,

" एक पोरगं भेटलं रस्त्यांत; गरीब बिचारं ! आणा दोन आण्यांच्या पैशासाठी आल्यागेल्यापुढं तोंड वेंगाडीत होतं. दया आली मला बिचाऱ्याची ! म्हणून मनांत नसतांहि घेतलं विकत हें. किती आनंद झाला बिचाऱ्याला ! "

चहा घेतांघेतां तो सुधेला म्हणाला, " आज ' माणूस ' चित्रपट लागला आहे. तुला जायचं असलं तर बघ. शेजारच्या द्वारकाबाईना घेऊन जा वाटलं तर. " त्याला वाटलें, आता तरी सुधा म्हणेल– " इश्श ! म्हणजे तुम्ही नाही का येत ? मग मी एकटी जाऊं होय ? "

पण त्याऐवजी सुधा म्हणाली, " होय का ? खरंच ! मग आपण आपलं जेवण उरकून घ्या झालं. माझी वाट नका पाहूं. "

चहा उरकल्यावर ती कपडे करण्याच्या तयारीला लागली कॉट-वर पडून एक पुस्तक तोंडापुढे धरून रमाकांत हिरमुसल्या अंतःकरणाने तिची गडबड पाहात होता

आज सुधा विशेषच खुशींत असावी. सारं प्रसाधन तिने अगदी काळजीपूर्वक चालविलें होतं. फिक्कट पोपटी रंगाचें एक सुंदर जरीचं नऊ वारी पातळ ती नेसली होती. तसल्याच पण जरा गडद रंगाचा

ब्लाउझ अंगांत घातला होता. गळ्यांतली सोन्याची साखळी काढून तिने एक मोत्यांचा सर घातला, हातांत नेहमीच्या बांगड्यांऐवजी अत्यंत नाजुक तासाच्या दोनदोन सोन्याच्या बांगड्या, मध्यें एक काचेची बांगडी--

सारा थाट मनासारखा जमल्यावर तिनें एकदा पुन्हा आरशात पाहिलें. गळ्यांतली माळ, आंबाड्यावरची वेणी उगीचच सारखी केली व परत वळणार तोंच तिच्या रमणीय आकृतीकडे मुग्ध होऊन पाहाणाऱ्या रमाकांताची आणि तिची नजरानजर झाली !

रमाकांताचा सारा अभिमान गळाला. हातांतलें पुस्तक फेकून देऊन तो उठला आणि सुधेचे दोन्ही हात पकडून तिच्या नजरेला आपली व्याकुळ आर्त दृष्टि भिडवीत म्हणाला,

" सुधा... "

आणि काय चमत्कार ! अेरवी रमाकांनाशीं वाद करणारी बेफिकीर सुधा त्याच्या या नजरेने बावरली, गोंधळली. तिची चर्या गोरीमोरी झाली, नजर खाली वळली.

डाव्या हाताने तिला जवळ ओढून उजव्या हातानें तिचें लाजरें मुख आपल्याकडे वळवीत कांहीशा अपराधी स्वरांत तो म्हणाला,

" सुधा, माझं तुझ्यावर प्रेम आहे. तूं मला आवडतेस. "

त्याला वाटलें, ती आपल्यावर रागावेल, आपला तिरस्कार करील. म्हणून तो तिच्या चेहऱ्याकडे सूक्ष्मतेने पाहात होता.

पण तसें कांही झालें नाही. त्याच्या बोलण्यानें ती अशी गोडशी हसली.

तिच्या या कृतीने जरासा धीर येऊन रमाकांत पुढे म्हणाला, " पण...तूं.. तूं...तुझं माझ्यावर..."

" इश्श ! कांहीतरीच !" असं म्हणून तिने असा एक कटाक्ष त्याच्याकडे फेकला, की अधिक कांही बोलण्याची गरजच उरली नाही.

त्या रात्रीच्या चित्रपटाला किती रंग भरला हें काय सांगायला पाहिजे ?

सोमवारी ऑफिसांत गेल्यावर जेव्हा त्याने गुप्ते वगैरे आपल्या मित्राना संध्याकाळी फीस्टचें आमंत्रण दिलें तेव्हा ते म्हणाले,

" शाबास कान्हेरे ! आम्हांला आतापावेतों कशाची दादहि लागू दिली नाहीत ना ? वा ! चांगलंच बनवलंत की !"

पण रमाकांतालाच आधी कुणीतरी बनवलें होतें ही अंदरकी बात बिचाऱ्यांना काय माहीत !

● ● ●

# समदुःखी

"कशाला येतेस तूं ? राहा झालं घरीं ! तिथं मोठमोठीं विद्वान माणसं येणार; बायका, पुरुष सारे मोकळेपणानं चर्चा करणार; प्रत्येकजण आपापले अनुभव सांगणार अन् तुला मात्र एका बाजूला मुकाटयानं बसावं लागेल. त्यापेक्षा घरीं बसलेलं काय वाईट ! मी येतों जाऊन एकटा."

स्वारीच्या तोंडचे हे शब्द ऐकून मला पाण्यांत ढेकूळ विरघळावे तसं झालें. वेणी घालण्यासाठी हातांत घेतलेला कंगवा गळून पडला. एक शब्दहि न बोलतां मी शरमून जमिनीकडे पाहात तशीच किती वेळ उभी होतें.

कपडे करून झाल्यावर आरशांत पाहाणें झालें. कपडयांवर शिंप-लेल्या सेंटचा मधुर सुगंध हवेंत दरवळला. जातांजातां ओढून घेतलेल्या दाराचा आवाज झाला.

खोलींत अंधार पडू लागला तेव्हा मी भानावर आलें. हा प्रसंग काही मला नवा नव्हता. माझे पति एक यशस्वी वकील तर होतेच; पण प्रतिष्ठित समाजसुधारकहि होते. आमच्या गावांतल्या अनेक संस्थांशी त्यांचा या ना त्या नात्याने संबंध होता.

मी त्यांची पत्नी जेमतेम इंग्रजी पांचवीपर्यंत शिक्षण झाल्या-वर माझें लग्न झालें. तेहि त्या वेळी नुकते कॉलेजमध्ये गेले होते

पण आज ते मोठे झाले होते. अनेक सभासमारंभाची त्याना आमंत्रणें येत. त्यांच्या बरोबरीची इतर माणसें असत तेथे बाय-काहि असायच्या कोणाकोणाच्या. पण त्या साऱ्या शिकलेल्या. फाड्फाड् इंग्रजी बोलत. राजकारण, समाजकारण, गांधीवाद, समाजवाद, अस्पृश्यांचे प्रश्न, हिंदी मजुरांचे प्रश्न असल्या मोठमोठया विषयांवर धीट-पणाने वादविवाद करीत, दुसऱ्यांची मतं खोडून काढीत

आणि अशा वेळी त्यांना माझी, आपल्या अर्धशिक्षित--अशिक्षितच म्हणा ना--पत्नीची लाज वाटे.

पण मी अशी अर्धवट राहिलें हा काय माझा दोष होता ?

मलासुद्धा शिकण्याची किती हौस होती ! यांचें शिक्षण संपून स्वतंत्र होईपर्यंत बोलायची सोयच नव्हती सासरी. पण आम्ही बिऱ्हाड केल्यावर मीं एक दिवस हळूच म्हटलें होतें, " प्रवेशपरिक्षेला तरी बसावं असं आहे माझ्या मनांत. इथं तशी सोयहि आहे. मी घालू का नांव क्लासांत ? "

" चल् ! वेडी कुठली ! मधे तीनचार वर्ष खंड पडल्यावर आता का कुठं अभ्यास होतो ! अन् परिक्षेचं काय मोठंसं महत्त्व आहे ! तुला वाटतील तितकी पुस्तकं आणून देतों. वाचून वाढव की ज्ञान हवं तेवढं. "

बोलल्याप्रमाणे त्यांनी कांही पुस्तकें आणूनहि दिली मला. पण यांच्या वाढत्या लोकप्रियतेबरोबर वाढलेल्या पै-पाहुण्यांची वर्दळ,

फीस्ट-पार्ट्यांची व्यवस्था अशा साऱ्या व्यापांतून त्या पुस्तकांकडे पाहायला मला कितीसा वेळ होणार ?

आमचा बायकांचा एक क्लब होता. त्यांत कव्हातरी अधूनमधून मी जात असें. बॅडमिंटन, कॅरम अशा खेळांबरोबर अशिक्षित बायकांसाठी इंग्रजी क्लासेस, शिवणकाम वगैरे शिकवण्याचाहि उपक्रम नुकताच सुरू झाला होता. साक्षरताप्रसाराच्या चळवळीच्या वेळी क्लबच्या कांही सभासदांनी गावांतल्या अस्पृश्य वस्तीत दोन क्लास उघडले. मीहि सुरवातीला त्यांत नांव दिलें होतें. पण बाहेरच्या या कामामुळे घरच्या व्यवस्थेकडे दुर्लक्ष होऊं लागलें. घरी आलेल्या कांही बड्या पाहुण्यांचं योग्य आदरातिथ्य नोकरांच्याकडून झालें नाही, स्वारीला राग आलेला दिसला म्हणून मी तें कामहि सोडून दिलें.

त्याचं कर्तृत्व आणि त्याबरोबर लौकिकहि वाढत होता.

त्यांची बायको म्हणून मलाहि पुष्कळ वेळां त्यांच्याबरोबर आमंत्रण असे. पण मला बरोबर नेण्याचें ते बहुतकरून टाळीत. त्या मुक्या अपमानाने माझ्या जिव्हारी जखम होई; पण तिच्या वेदना मी निमूटपणें मनांतल्या मनांत जिरवीत असें.

आजचा प्रसंगहि त्यांतलाच होता ते निघून गेले आणि मी अपमानित होऊन तशीच उभी होतें.

गड्याने येऊन दिवे लावले; स्वयंपाक काय करायचा म्हणून बाओी विचारायला आल्या तेव्हा मला आपोआपच तिकडे लक्ष देणें भाग पडलें.

आठ वाजायला आले तरी स्वारीचा पत्ता नव्हता ! कांहीतरी करायचें म्हणून मी बाहेर दिवाणखान्यांत येऊन बसलें आणि सहज टेबलावरचें वर्तमानपत्र उचलून घेतलें. एकदोन पानें चाळतांच माझें लक्ष एका बातमीने वेधून घेतलें.

सुलोचना प्रसादे नांवाच्या एका होतकरू लेखिकेला तिच्या नवीन कादंबरीबद्दल सुप्रसिद्ध कीर्तिकर पारितोषक मिळाल्याची ती बातमी होती.

सुलोचना प्रसादे !... या नांवाबरोबर अनेक आठवणींनी माझ्या मनांत गर्दी केली आणि मी बरीच अस्वस्थ झालें.

सुलोचना माझी बालमैत्रीण. मराठी दुसरीत आम्ही एकत्र आलों. लग्न झाल्यामुळे मी शिक्षण अर्धवट सोडलें आणि ती मॅट्रिक होऊन कॉलेजांत गेली तरी आमची मैत्री अबाधितच राहिली होती. मी माहेरी गेलें म्हणजे तिची आणि माझी गाठ पडे. शिवाय आम्हां दोघींत पत्र-व्यवहारहि सुरू असे. नंतर तिचें लग्न झालें. तिचा नवरा तिच्याच कॉलेजांत शिकणारा विद्यार्थी होता. तिच्याहून तीन वर्षें सीनियर. तो एम्. ए. झाला तेव्हा ती ज्यूनिअरला होती. तीन वर्षांच्या सहवासानें एकमेकांचे स्वभाव, आवडीनिवडी जुळल्यानंतर त्यांचा रजिस्टर विवाह झाला होता.

मी तेव्हा माहेरीच होतें लग्नाची फीस्ट झाली तेव्हा मी गेलें होतें. दोघांचा अनुरूप जोडा पाहून मला वाटलें, सुलोचना किती भाग्यवान् !

लग्नानंतर मधुचंद्रासाठी दोघेंहि गोव्याच्या बाजूला गेली होती. त्यानंतर तिची माझी पुन्हा भेट झाली नाही तरी तिची पत्रें अधूनमधून येतच.

सुलूची लेखनाची आवड कॉलेजांत शिकत असल्यापासूनची होती. लहानमोठ्या मासिकांतून आणि साप्ताहिकांतून तिच्या गोष्टी, गुज-गोष्टी कधीकधी प्रसिद्ध होत. खरोखरच छान लिहीत असे ती. पण आम्हीं मैत्रिणींनी मुद्दामच खोडसाळपणाने तिच्या लिहिण्याची चेष्टा करावी म्हणजे चिडून इतकी लालेलाल व्हायची ती की विचारूं नका !

लग्न झाल्यावर तर तिचा हा लेखनाचा व्यासंग वाढतच गेला. पहिल्या वर्षाच्या अखेरीस तिची एक कादंबरीहि प्रसिद्ध झाली. तिची

एक प्रत त्यावर आपल्या तिरप्या अक्षरांत माझें नांव घालून भेट म्हणून पाठवायला ती विसरली नव्हती.

पण पुढे कां कोण जाणे, तिची पत्रें पहिल्याइतक्या नियमितपणाने आणि आपुलकीने येइनाशी झालीं. मला वाटलें, स्वतःची कीर्ति वाढूं लागल्याबरोबर गरीब मैत्रिणीचा तिला कंटाळा आला असावा.

अन् मीहि तिला पत्र लिहिण्याची टाळाटाळ करूं लागलें. गेल्या वर्षभरांत तर मला तिच्याकडून कांहीच कळलें नव्हतें.

या साऱ्या आठवणी आत्ता तिच्या नांवाबरोबर जाग्या झाल्या अनेक परस्परविरोधी भावनांनी माझें मन गुदमरून गेलें होतें.

मला वाटलें, आपली पहिली कादंबरी प्रसिद्ध होतांच मला तातडीने भेट पाठवून माझा अभिप्राय विचारणारी सुलू...आज तिचा इतका गौरव होऊन मला त्याचा पत्ताहि असूं नये ? वर्तमानपत्रांतून आठपंधरा दिवसांनी ही शिळी बातमी कळावी ?

आठवण होतांच मी चट्कन् उठलें आणि खोलींतल्या कपाटातून तिची ती पहिली कादंबरी बाहेर काढली. बरेच दिवस हात न लावल्यामुळे तिच्यावर धूळ साचली होती. ती हाताने झटकून मीं पहिलें पान उघडलें. त्यावर मध्यभागीं लिहिलें होतें—

" ज्यांच्या मधुर सहवासांत मला लिहिण्याची स्फूर्ति झाली आणि प्रेमळ प्रोत्साहनामुळे हें लेखन माझ्या हातून शेवटास गेलें त्यांना प्रेमपूर्वक अर्पण.

**सुलोचना."**

पुढची पानें चाळतां चाळतां त्यांत मला एक पत्र सापडलें. सुलूचेंच होतें तें. तिने लिहिलें होतें —

“ इंदूताई, अलीकडं बरेच दिवसांत मीं तुला लिहिलं नाही म्हणून तूं रागावली असशील. पण सोबतचा नजराणा पाहिल्यावर तुझा राग शांत होईल अशी मला खात्री आहे.

“ गेले कांही दिवस या कादंबरीच्या प्रकाशनाच्या धांदलीत गेले. त्यामुळं वेळच झाला नाही बघ.

“ कादंबरीबद्दलचा अभिप्राय लवकरच कळव. मागं माझी थट्टा करीत असस तसं नव्हे हं ! खरंखरं मत. कादंबरीच्या लेखनगुणांबरोबर तिच्या बहिरंगाबद्दलसुद्धा.

“ असं मी कां विचारलं माहीत आहे ? कादंबरीची लेखिका मी नांवाला असलें तरी त्याचं सारं श्रेय विश्रामना आहे. त्यांनी जर इतका जोर धरला नसता तर माझ्या हातून लिहून झालंच नसतं. कुठली काना-कोपऱ्यांतली नवशिकी लेखिका मी...पण विश्रामच्या प्रयत्नानंच कादं-बरी अशा सुंदर स्वरूपांत प्रसिद्ध होऊं शकली. त्यांचा हा सारा उत्साह अन् लेखनांत मला होणारी मदत पाहून मी म्हटलं, ‘ तुम्हीच कां नाही लिहीत मग ?’ त्यावर ते म्हणाले, ‘ छे बुवा ! आपल्याला नाही जुळायचं तें !’

“ अन् स्निग्धपणानं माझ्याकडे पाहून ते हसले. मला माहीत आहे त्यांच्या या हसण्यांतलं मर्म. स्वतःच्या पत्नीचा गौरव झालेला पाहाण्यांतच आनंद वाटतो त्यांना. खरंच अिंदुताई, किती चांगले आहेत विश्राम.. ”

सुलोचनेचें तें पत्र आज पुन्हा वाचतांना चारपांच वर्षांपूर्वी माझ्या मनांत ज्या खेदाच्या ऊर्मी उसळल्या होत्या त्यांहूनहि अधिक जोराने त्या आताहि उसळल्या. विश्रामसारखा उदार विचारांचा, पत्नीवर निरतिशय प्रेम करणारा पति माझ्या मैत्रिणीला मिळाल्याबद्दल मला एकीकडे समाधान वाटत असलें तरी तें पूर्ण निर्मळ नसे. स्वतःच्या परिस्थितीची तिच्याशीं तुलना करून माझें मन खिन्न होई. मला वाटे,

माझें जर इतक्या लवकर लग्न झालें नसतें, खूप शिकण्याची, मोटेपणा, नांवलौकिक मिळविण्याची संधि मिळाली असती तर . ! मीहि आज तिच्यासारखी लोकांच्या आदराचा, कौतुकाचा विषय होऊन राहिलें असतें. आणि मग माझ्या पतीनेहि माझा अवमान न करता मोठ्या दिमाखाने मला आपल्याबरोबर वागवण्यांत भूषण मानलें असतें.

बाहेरचें दार वाजलें आणि पाठोपाठ स्वारीची चाहूलहि ऐकूं आली म्हणून मीं हातांतलें पुस्तक कपाटांत ठेवलें आणि बाहेर आलें.

" तयारी आहे ना ? " कपडे उतरतांना मला विचारलें. मी मानेनेच होकार दर्शविला.

पाटावर बसता बसतां मला विचारणें झालें, " तुझी मैत्रीण, त्या सुलोचना प्रसादे, तिला मोठं बक्षीस मिळालंय् या वर्षी. तुला कळलं असेलच ना ? "

" हो, आत्ताच वाचलं मी चित्रेंत. "

" आत्ता ! इतक्या उशीरां ? गेले आठदहा दिवस वर्तमानपत्रांतून सारखं अभिनंदन होतंय् त्यांचं अन् तुला आज कळतंय् ! छान आहे तुमची मैत्री ! थंडावलेली दिसतेय् आताशा ! एखादं पत्रबित्र तरी पाठवलंस का नाही अभिनंदनपर ? छे बुवा ! अगदी कशी तूं अळणी ! "

सुलोचनेचा आणि माझा स्नेहसंबंध अलीकडे दुरावल्यासारखा झालेला असला आणि तिच्या तुटकपणामुळे मला तिचा कांहीसा राग आलेला असला तरी तिच्या गौरवामुळे मला एरवी आनंद झाला असता; पण आधीच दुपारपासून माझें मन विषादाने भरून गेलें होतें त्यांत स्वारीच्या आत्ताच्या बोलण्यामुळे मी अधिकच कष्टी झालें !

मी कांही बोलत नाहीसें पाहून पुन्हा म्हटलें, " बरं. उद्या तरी पाठव बरं का पत्र सुलोचनाबाईंना न विसरतां. "

मला आश्चर्य वाटलें आणि रागहि आला.

सुलू माझी मैत्रीण असली तरी ती मैत्री माहेरची होती. यांचा व तिचा परिचयहि नव्हता. आमच्या उभयतांत तिच्याविषयी कधी संभाषणहि झालें नव्हतें. इतकेंच नव्हे, तर प्रथमच एकदोन वेळां सुलूचीं पत्रें त्यांनी मला आलेलीं पाहिलीं तेव्हा तिची थोडीबहुत कुचेष्टाहि केली होती. असें असतांना यांना सुलोचनेविषयी कौतुकाचा आणि आदराचा इतका अनपेक्षित उमाळा यावा हें नवल नव्हे का !

मीं जरा रोषानें म्हटलें, " माझ्या मैत्रिणीशी कसं वागावं हं माझं मला कळतंय्, दुसऱ्यानं नको सांगायला. "

" कळत असतं तर सांगण्याचा प्रसंग कशाला आला असता ? अग, अशा माणसांशीं ओळख असणं हें भूषण आहे. पण तुला त्याचं कांऽऽही नाही ! "

उगीच शब्दाने शब्द वाढवायला नको म्हणून मी गप्पच होतें. बोलणं पुढे चालूच होतें–

" हें बघ, येत्या दहा तारखेला सुलोचनाबाईंचा इथल्या कलामंडळाकडून सत्कार व्हायचाय् तेव्हा आपल्याचकडे त्यांना उतरून घेऊं या. काय समजलं ? अग, तुझी एवढी विद्वान मैत्रीण, तिच्याबरोबर तुझाहि जरा मान होईल ना चारचौघांत ' आलं का लक्षांत ? म्हणून म्हटलं, उद्या पत्र लिही छानसं अन् त्यांतच हलकेंच 'सूतोवाच' करून ठेव इकडे येण्याबद्दलचं. "

अस्सें ! आत्ता आलें लक्षांत ! सुलूला येथे बोलावून घेऊन माझी नव्हे तर आपली प्रतिष्ठा वाढविण्याचा बेत आहे तर स्वारीचा !

उद्या सुलू यायची म्हणून आजपासून स्वारीच्या जिवाची नुसती धांदल उडून गेली होती. गड्याकडून बैठकीच्या जागेची साफसफाई करून घेणें, तिच्याकरिता एक खोली व्यवस्थित सजवून ठेवणें वगैरे कामें जातीनिशी देखरेख करून चाललीं होतीं. मला मधूनमधून उगीचच

निमित्तापुरती मध्ये ओढणें चाललें होतें, आणि नाइलाज म्हणून मला त्याचा प्रतिकार करतां येत नव्हता, तरी मनांतून मात्र मी चिडलें होतें. तसें पाहिलें तर सुलोचनेचा कांही अपराध होता का? पण स्वारीइतकाच तिचाहि मला राग आला होता.

संध्याकाळीं स्टेशनवर तिला आणायला मी यांच्याबरोबर गेलें खरी; पण माझ्या मनांत राहून राहून येत होतें, कांहीतरी कारण होऊन जर ती आली नाही तर किती बरं होईल! अश्शी जिरेल यांची!...

धाडधाड करीत गाडी प्लॅटफॉर्मवर आली आणि पुढच्याच डब्यांत खिडकीतून बाहेर तोंड काढून उभी असलेली सुलोचना मला दिसली. मला पाहातांच तिने हात उंच केला.

आम्ही डब्यापाशी गेलों. पांच वर्षांपूर्वी जशी मी तिला पाहिली होती तशीच ती अजूनहि दिसत होती. खेळकर, आनंदी मुद्रा, गड-बड्या स्वभाव, लाघवी बोलणें, सारें तस्सेंच!

मला जवळ आलेली पाहातांच तिनें माझ्या खांद्यावर दोन्ही हात ठेवून मला जवळजवळ मिठीच मारली– "किती दिवसांनी आपली गाठ पडली ग?" आनंदाने व समाधानाने ती उद्गारली.

तिच्या त्या मनमोकळ्या प्रेमळ स्पर्शाने माझ्या मनांतला विषा-दाचा अंधार नाहीसा होऊन माझेंहि मन प्रसन्न झालें. कौतुकाने तिला न्याहाळीत मीं म्हटलें, "होतीस तशीच अवखळ आहेस सुले अजून तूं!"

सुलु आणखीहि कांही बोलणार होती, तितक्यांत पुढे होऊन तिला नमस्कार करीत स्वारीने म्हटलें,

"जरा वेळ वाट पाहिली; पण मैत्रिणीमैत्रिणी दंग झाल्या आहेत आपल्यांतच; तेव्हा मीच आता माझी ओळख करून देतों. मी कमलाकर देसाई..."

"ओऽक्षमा करा हं, नमस्कार!" गोडसें हसून सुलूने दिलगिरी दर्शविली.

सामानसुमान हमालाच्या स्वाधीन करून आम्ही गाडीत येऊन बसलों केव्हा हें कळलें नाही. स्वारी सुलूशी बोलण्यांत दंग होऊन गेली होती मधूनमधून ती मला उद्देशून कांहीतरी उद्गार काढी. त्या वेळी हसून अगर एखाददुसरा शब्द उच्चारून मी तिच्याकडे लक्ष असल्याचें दाखवी, एवढेंच.

झाकाळलेल्या आकाशांत वीज क्षणभर चमकून नाहीशी व्हावी तसा सुलूच्या भेटीने प्रथम माझ्या मनांत उत्पन्न झालेला आनंद ओसरून गेला होता.

तीं दोघें मोठ्या उत्साहानें निरनिराळ्या विषयांवर बोलत असतांना त्रयस्थासारखें तिथे बसणें मला असह्य झालें होतें.

सुलू आली आणि तिच्या पाठोपाठ अनेक पाहुण्यांनी आमचें घर भरून गेलें. त्यांत स्त्रिया होत्या, पुरुष होते. कोणी तिला आपण चालविलेला समाज पाहून जाण्याचें आमंत्रण दिलें, कोणी नवीन सुरू होणाऱ्या वाचनालयाचें उद्घाटन तिच्या हातून व्हावें अशी इच्छा दर्शविली, कोणी शाळेचा राहिलेला बक्षीससमारंभ तिच्या हस्तें साजरा करण्याचा बेत केला.

माझे पति, आजच्या सन्मान्य पाहुणीचे आपण यजमान आहोंत या रुबाबांत आल्यागेल्याचें स्वागत करीत होते. त्यांच्या चेहऱ्यावर अभिमानाचें चांदणें फुललें होतें आणि मी येणाऱ्या प्रत्येकजणाच्या आवडी-खोडीला अनुसरून कोणाला चहा, कोणाला सरबत तर कोणाला दूध असें देऊन गृहिणीधर्म बजावीत होतें.

तिथे चाललेल्या वाटाघाटींत माझें काही काम नव्हतें. अर्थात् माझ्याकडे कुणाचेंहि लक्ष जाण्याचें कारण नव्हतें!

सुलूच्या तीन दिवसांच्या मुक्कामांत तिला माझ्याशी तीन मिनिटेंदेखील बोलायला वेळ झाला नव्हता. इतकी तिच्याभोवती कार्यक्रमांची गर्दी होऊन राहिली होती.

पहिल्या एकदोन समारंभांना उगीच वाईट दिसूं नये म्हणून मी तिच्याबरोबर गेलें होतें. पण पुढे घरच्या कामांची सबब सांगून मीं येण्याचें नाकारलें.

यांनी तोंडदेखलें "चल, चल" म्हटलें; सुलूनेहि थोडाबहुत आग्रह केला; पण माझा निश्चय पाहून तिने पुढे फारसें ओढून धरलें नाही.

आज तर दुपारीं दोन वाजतां ती दोघेंजण जीं बाहेर गेलीं होतीं तीं रात्री दहा वाजून गेले तरी परत आलीं नव्हतीं. मुलांचीं जेवणें उरकून मीं बाईला घरी जायला सांगितलें अन् वाट बघत बसलें.

साडेदहा वाजतां दोघें हसत-खिदळतच आलीं. मला पाहातांच दोघांनी एकदमच सांगितलें, "छे बुवा! आता भूक बिलकुल नाही इतकं खाणं झालं आहे ठिकठिकाणी! तूं आपलं जेवून घे."

इतक्या उशिरा मलाहि खाण्याची इच्छा नव्हती. अन्नाची झाकपाक करून मी बिछान्यावर अंग टाकलें. इतक्यांत मला आठवण झाली, दुपारच्या डाकेने तिचें एक पत्र आलें होतें. कांही जरुरीच्या कामाचें असलें तर आत्ताच तिला द्यावें असें वाटून मी उठलें आणि तें पाकीट घेऊन तिच्या खोलीजवळ गेलें. फटीतून मंदसा प्रकाश दिसत होता. मीं कानोसा घेतल्यासारखें केलें. रडण्याचा हुंदका दाबावा तसा आवाज ऐकूं आला.

मला नवल वाटलें आणि मीं हळूच दार लोटलें. टेबलापाशी दोन्ही हातांत डोकें धरून सुलोचना बसली होती.

हा काय प्रकार!... सुलोचनेच्या डोळ्यांत पाणी? आणि तें काय म्हणून? ..

दारीचा आवाज ऐकून तिने माझ्याकडे पाहिलें. आपली विकल अवस्था लपविण्याचा तिने यत्किंचितहि प्रयत्न केला नाही.

पुढे होऊन तिच्या खांद्यावर हात ठेवून मीं विचारलें,

" काय झालं ग ? "

माझे दोन्ही हात आपल्या हातांत घेऊन ती हळूच म्हणाली,
" तुला झोप येत नसेल तर बाहेर बागेंत चल. बसूं या घटकाभर. येतेस ? "

" चल. " मीं म्हटलें. आम्ही दोघी बाहेर आलों.

बाहेर अष्टमीचें मंदसें चांदणें पडलें होतें. आम्ही दोघी एका बाकावर जाऊन बसलों.

बराच वेळ एकमेकींची नजर चुकवीत आम्ही स्तब्ध बसलों होतों. अखेर तिनेच सुरवात केली--

" आज तीन दिवस झाले, तुला अन् मला स्वस्थपणानं बोलायला अशी फुरसतच झाली नाही. उद्या तर मी जाणार ! म्हणून म्हटलं जरा वेळ बसूं या बोलत. खरंच इंदुताई, दिवस कसे भरभर जातात, नाही ग ? "

" होय ना. " कृत्रिम हसूं तोंडावर आणून मी म्हटलें. अजून मोकळेपणाने संभाषण होण्याइतकी कळी उमलली नव्हती माझी.

" खरंच, तू अशी अबोल कशानं झाली आहेस ग ? आज तीन दिवस बघतें आहे, हसत नाहीस, बोलत नाहीस. रागावली तर नाहीस ? "

" इश्श ! रागवायचं कशासाठी अन् कुणावर ? " मनांतली रुष्टता लपवीत मीं म्हटलें.

" कुणावर म्हणजे ? माझ्यावर. माझ्या या मानसन्मानाचा हेवा वाटतोय् तुला ! खरं ना ? "

सुलूने अगदी मर्मावरच चिमटा घेतला होता मला. तिच्या या सरळ हल्ल्याने मी चीतच होऊन गेलें. तरीपण तेवढयांतल्या तेवढयांत मी बतावणी केलीच, " इश्श, कांहीतरीच काय बोलतेस ? तुझा गौरव झालेला पाहून मला आनंद वाटेल की हेवा ? तुझं-माझं काय वैर आहे हेवा वाटायला ? "

" हें बघ, रागावू नकों. अग, स्वाभाविकच आहे तें. तुझ्या जागी मी असतें तर मलादेखील तुझ्यासारखं वाटलं असतं. "

" तें काय म्हणून ? " विषयाला तिने अशी निराळी कलाटणी दिलेली पाहून मी धूर्तपणाने विचारलें.

" का म्हणजे ? एके काळच्या सारख्या दर्जाच्या मैत्रिणी आपण. संधि मिळून मला थोडाबहुत लौकिक मिळवतां आला, तू घरदार अन् संसार यांतच गुरफटून राहिलीस हा काय तुझा दोष ? पण आज लोक, लोकच काय, तुझे पतीदेखील माझा उदोउदो करताहेत, मला आपली पाहुणी म्हणून बरोबर घेऊन हिंडण्यांत भूषण मानताहेत. त्यांच्या पुरुषी मनोवृत्तीला साजेसंच आहे तें. पण तुला– पत्नीला हें कसं सहन व्हावं ? अन् हें सारं करीत असतांनाची तुझ्याबद्दलची त्यांची उपेक्षावृत्ति, तुझी उदासीनता, या साऱ्या गोष्टी मला दिसल्या नाहीत असं का वाटतं तुला ? इंदुताई, स्त्रियांच्या भावना स्त्रियांना अचूक ओळखतां येतात, समजलीस. "

सुलोचनेच्या या बोलण्याने किती बदल घडवून आणला माझ्या मनांत ! तिने माझ्या अंतःकरणाचा अचूक ठाव घेतला होता, एवढेंच नव्हे, तर त्या सहानुभूतीच्या शब्दांनी तिच्यामाझ्यांत उत्पन्न झालेलें अंतर एकदम कमी केलें होतें.

तिच्याजवळ सरकून मी तिचे हात आपल्या हातांत घेतले आणि शोधक दृष्टीने तिच्याकडे पाहात म्हटलें, "सुलूताई, खरंच का तुला असं वाटतं ?"

माझ्याकडे आपल्या स्थिर, प्रेमळ नजरेने पाहात मुलने उत्तर दिलें, "वाटतं काय, पटतंहि! मला तरी काय हें सारं बरं वाटत होतं? म्हणूनच तुला तें सांगून तुझा गैरसमज दूर करायची संधीच बघत होतें मी"

झालें! तिच्या या बोलण्याने माझ्या मनातली सारी शंका दूर झाली आणि आम्ही मोकळ्या मनाने बोलू लागलों. माझा सारा सांसारिक इतिहास सांगून मी तिला म्हटलें,

"त्यांना तरी कशाबद्दल दोष द्यायचा! हंच जर मी तुझ्यासारखं कशांत तरी नांव मिळवलं असतं तर..."

"चुकीची समजूत आहे तुझी." मध्येच खिन्नपणाने हसून सुलोचना म्हणाली.

"म्हणजे?" मी आश्चर्याने विचारलें, "कशावरनं म्हणतेस तूं?"

"कशावरून म्हणजे काय! अनुभवाची गोष्ट आहे ही"

माझ्या डोक्यांत एकाएकी प्रकाश पडल्यासारखें झालें. विश्रामचं अन् हिचं बिनसलें तर नाही?

मघाशी ती खोलीत अशी सचिंत बसली होती त्याचं कारण हंच तर नसेल? पण कां बिनसावें बरें?

मनांतल्या या शंकांचा स्पष्टच खुलासा करून घ्यावा म्हणून मीं तिला विचारलें,

"सुलूताई! तुझ्या स्वतःच्या संसाराबद्दल तर म्हणत नाहीस तूं हें? विश्रामसारखा प्रेमळ आणि उदार विचारांचा पति..."

"हूं! मलाहि लग्न झालं तेव्हा असंच वाटत होतं बिंदुताई. त्या वेळच्या पत्रांत विश्रामबद्दल मीं वेळोवेळी काढलेले उद्‌गार आठवतात तुला?"

" न आठवायला काय झालं ? परवाच मी तुझी पहिली कादंबरी चाळीत होतें त्यांत तुझं एक जुनं पत्रहि सापडलं मला. विश्रामनी तुझ्या साहित्यसेवेंत तुला दिलेलं उत्तेजन अन् केलेली मदत यांचं प्रत्यक्ष प्रतीक म्हणजेच तूं त्या पुस्तकाला लिहिलेली अर्पणपत्रिका, नव्हे का ? असं असून..."

" त्या वेळचा विश्रामबद्दल मला वाटणारा सादर अभिमान सकारणच होता इंदुताई. पण पुढं... पुढं मला दिसून आलं, की शिक्षणानं अन् संस्कृतीनं पुरुषानं उदारतेचा किती जरी आव आणला अन् स्त्रीला-- पत्नीला-- बरोबरीच्या नात्यानं वागण्याचा देखावा केला तरी स्वतःसंबंधीची श्रेष्ठपणाची मालकीची कल्पना नाहीशी होत नाही. पत्नीची विद्वत्ता, लौकिक, मानसन्मान यांनी पतीला आनंद होतो, पण तो कुठपर्यंत ? त्यामुळं त्याचा मोठेपणा वाढतो आहे असं त्याला वाटतं तोंपर्यंत. आपली मोटार अद्यावत् नमुन्याची अन् उंचीपैकी आहे, आपलं घरदार अगर सजावट-सामान इतरांच्याहून अधिक मोलाचं आहे, या कल्पनेचा जो आनंद, तो अन् हा सारखाच. विश्रामला माझ्या-बद्दल वाटणारा अभिमान याच स्वरूपाचा होता. प्रथम आपल्याबरोबर तो मला जिथंतिथं घेऊन जाई; आपली साहित्यिक पत्नी म्हणून माझी मोठ्या अभिमानानं सर्वांशी ओळख करून देई माझी एक कादंबरी चित्रपटासाठी घेण्यांत आली तीहि त्याच्या प्रयत्नांमुळंच आमच्या दोघांच्या आनंदाची कमान त्या वेळी सारखी चढत होती. पण पुढं माझं स्वतःचं असं एक समाजांत स्थान निर्माण झालं, मला स्वतःला अनेक लोक ओळखूं लागले नी इथंच विश्रामचं पुरुषी स्वरूप उघड होऊं लागलं. आम्ही दोघं फिरायला गेलों की कित्येकदा कोणी साहित्य-सभेचे चिटणीस, पुस्तकांचे प्रकाशक, मासिकाचे संपादक भेटत आणि मला नमस्कार करून कांहीतरी बोलत माझ्याबरोबर येत. ते आपल्या रस्त्यानं निघून गेले आणि मी शेजारी चालत असलेल्या विश्रामकडे बघितलं की त्या वेळीं त्याच्या कपाळावर आठयांचं जाळं उमटलेलं

मला दिसे. त्याला कांही विचारलं तरी तिरसटासारखी तुटक उत्तरं देई तो अशा वेळी. रोजच्या टपालांत कधी त्याचं एकहि पत्र नसलं अन् माझ्या नांवाची कसल्या सभा-समारंभांची आमंत्रणं, लेखन-सहाय्याबद्दलची विनंतीपत्रं, प्रसिद्ध झालेल्या लिखाणावरचे अभिप्राय असा भला मोठा ढीग दिसला की धुसफुसूं लागे ! दारावरची घंटा वाजलेली पाहून त्यानं लगबगीनं पुढं यावं आणि आलेल्या व्यक्तीनं सुलोचनाबाईंना भेटायचं आहे म्हणून आदबीनं सांगावं, असा प्रकार होऊं लागला. हळूहळू तो अबोल, घुम्या बनला ! मी त्याला पुष्कळ समजावून पाहिलं, पण हा विषय काढला, की तो तोंडाला कुलूप लावी अगर उठून जाई. मला त्याच्या वागण्याचं कारण कळून आलं होतं. त्याला उपाय एकच होता तो म्हणजे मी आपला व्यवसाय सोडून देणं. पण तसं करणं म्हणजे माझ्या मनाचा कोंडमारा, जिवंत मृत्यूच म्हणायचा तो ! "

" मग झालं काय अखेर ? " बोलतांना ती थांबलेली पाहून मी आतुरतेने विचारलें.

" व्हायचं काय ! असाच धुमसत चाललाय् आमचा संसार ! परवा मला इकडं येण्याबद्दल आमंत्रण आलं तेव्हा त्याची-माझी थोडीशी बोलाचालीहि झाली आणि रागांतच मी इकडे निघून आलें. "

" आणि पुढं ? "

" पुढं काय ? नेहमीचंच आहे हें. मी परत जाईपर्यंत होईल शांत त्याचा राग. आल्यावर मी पत्र लिहिलं एक, पण त्याचं उत्तर कांही आलं नाही ! "

" अग, मग हेंच तर नव्हे तें ? " इतका वेळ माझ्यापाशींच राहिलेलें पत्र मी खिशांतून काढून तिला दिलें.

किती अधीरतेने व्हरांड्यांतल्या दिव्यापाशी जाऊन वाचलें तिने तें ! तिची ती उत्कंठा पाहून विश्रामवरच्या तिच्या प्रेमाची मला खात्री पटली. पत्रांत काय लिहिलें असावें या उत्कंठेने मी तिच्याकडे पाहात होतें.

पत्र लहानच असावें. वाचून होतांच ती हसली.

मीं विचारलें, " काय आहे ग त्यांत ? "

तिने न बोलतां तें पत्रच माझ्या हातीं दिलें. त्यांत लिहिलें होतं–

" पुष्कळ विचार करूनहि हल्लीच्या दोघांच्या परिस्थितींत कस-लीच तडजोड होणं अशक्य वाटल्यावरून आपण एकमेकांना विवाहबंधनांतून मुक्त करावं हेंच योग्य.

**विश्राम.** "

त्या चार ओळी वाचून होतांच मी मान उचलून तिच्याकडे पाहिलें. तिचे डोळे भरून आले होते तरी ती हसण्याचा बळेंच प्रयत्न करीत होती.

" सुलूताई . " तिच्या खांद्यावर दोन्ही हात ठेवून मी म्हटलें.

उत्तरादाखल कांही न बोलतां तिने माझ्या कुशींत तोंड लपवून एक गुदमरलेला हुंदका दिला.

तिच्या-माझ्यांत मला वाटत असलेला परकेपणा आणि अंतर नाहीसें होऊन आम्ही दोघीहि समदुःखी झालों होतों कारण...?



# प्रेमाची ओढ

घड्याळांत जेव्हां आठाचे ठोके पडले तेव्हां विनायकानें तोंडावरचें पांघरूण दूर केलें, हातापायांना तणावा देऊन एकवार आळस दिल्यासारखें केलें आणि तो अंथरुणावर उठून बसला. आणि कांहीशा जड व कंटाळलेल्या मुद्रेनें त्यानें सभोंवार नजर फेकली.

आज रविवार असल्यामुळे कचेरीला सुटी होती. पण त्या सुटीचें सुख भोगण्याइतका विनायक दैववान कुठे होता ? कारण...पण कारण मीच कशाला सांगायला हवें ? त्या खोलीचें आणि तिच्या दरवाजांतून आंतल्या भागाचें जें स्वरूप दिसून येत होतें त्यावरून त्याविषयी सहज कल्पना होण्यासारखी होती. खोलीत साठलेला केर, अव्यवस्थितपणानें पसरलेल्या सर्व वस्तु, खुंटाळ्यावर वेडेवाकडे फेकलेले कपडे, आंतल्या बाजूस स्टोव्हजवळ पडलेला चहाचा पसारा या सगळ्या

देखाव्यावरून विनायकराव हे एकटेच त्या ' विस्कटलेल्या संसाराचे ' सध्या तरी मालक होते. 'सध्या तरी' म्हणण्याचें कारण असें, की त्यांची पत्नी शारदा गेले पंधरा दिवस माहेरीं गेली होती.

" आता स्वतःच उठून चहा बनवायचा, स्नानाची व कपड्यांची व्यवस्था पाहायची, खानावळीच्या बेचव अन्नाचे चार घास पोटांत ढकलून दिवसभर वेळ घालविण्यासाठी कुठंतरी भटकायचं ! छे बोवा, कंटाळा आला अगदी ! शारदेला जायला परवानगी दिली हेंच मुळी चुकलं आपलं. एक नव्हे, दोन नव्हे, पंधरा दिवस होऊन गेले तरी हिची माहेरवासाची तृप्ति झाली नाहीं अजून ! आज काय म्हणे वहिनीचं डोहाळजेवण अन् परवा ताईच्या मुलाचं बारसं ! कांहीतरी सबबी काढायच्या, दुसरं काय ! बाकी परवाचं पत्र जरा कडकच लिहि-लंय् मी त्याचा परिणाम बहुतक होईलसं वाटतंय् पाहूं या काय होतंय् तें " असा मनाशी विचार करीत एकदाचा आळस झाडून विनायक उठला

स्टोव्हवर आधण उकळत होतं. मनाशीच कांही गुणगुणत विनायक चहाची तयारी करीत होता. इतक्यांत ' टप्टप् ' असा पावलांचा आवाज आला. विनायकाला त्या पावलांची चाहूल ओळ-खीची होती. अधीर मनाने तो दाराकडे पाहूं लागला. त्याच्या दारा-जवळ तो आवाज थांबला व फटींतून एक पाकीट आणि एक कार्ड आंत पडलें.

झालें ! तयार झालेला चहा तसाच राहिला. चट्कन् उठून विनायकाने आधी पाकीट उचललें. पत्त्यावरील अक्षरांकडे आधी नजर फेकून तें अपेक्षित व्यक्तीचेंच आहे अशी खात्री करून घेतली आणि नंतर अधीरपणाने तें फोडलें. वाचतांना आधी स्मित मग आश्चर्य व त्रासिकपणा इत्यादि अनेक विकार त्याच्या मुद्रेवर दिसत होते.

वाचतांना मध्येच तो थांबला आणि पत्र रागाने समोरच्या टेबला-वर फेकून क्षणभर अस्वस्थ चित्ताने त्याने इकडून तिकडे येरझाऱ्या घातल्या. पुन्हा एकदा पत्र उचलून घेतलें, वाचलें आणि मनाशीच त्रासिकपणाने कांहीतरी पुटपुटत निवून चाललेल्या चहाकडे लक्ष जातांच सावध झाल्यासारखें होऊन त्याने कप उचलला, तोंडाला लावला. तो थंडगार झालेला चहा बरा कसा लागणार ? पहिला घोट घेतांच तोंड वेडंवाकडें करून त्याने उरलेला चहा रागारागाने मोरीत ओतला, मनाशी जळफळत पुन्हा स्टोव्हवर आधण चढण चढवलें

तें पत्र शारदेचें असावें हें वाचकानी ओळखलें असेलच. पण त्यांत विनायकाची तब्येत 'गरम' होण्यासारखा काय बरें मजकूर असावा ? आपण त्या पत्रातला महत्त्वाचा मजकूरच वाचून पाहूं म्हणजे समजेल काय तें !

शारदेने लिहिलें होतें--

"परवाच्या पत्रावरून स्वारी खूपच रागावलेली दिसते ! पण मी तरी काय करूं ? सगळ्यांच्या आग्रहापुढं माझं कांही चालत नाही. आपल्याला वाटतं मी इकडे चैनीत आहें; आपली आठवणसुद्धा होत नसेल, पण असं होईल का कधी ? आपल्याला तिथं किती कंटाळवाणं नी उदास वाटत असेल, जेवणाखाण्याची किती गैरसोय होत असेल हें सगळं माझ्या मनांत येत का नाही ? असं एखादे वेळी मनांत येतं, की सग-ळयांच्या चेष्टेला व आग्रहाला न जुमानतां, 'मला गेलंच पाहिजे' असं सांगून निघून यावं. पण मनांत आलं तरी तें कृतींत उतर-वतांना माणसानं थोडा विचार नको का करायला ?

"आमचे काका आज दहा वर्षांनी सगळ्यांना भेटायला येताहेत. दहा वर्षांपूर्वी ते कलकत्त्याला गेले तेव्हा मी परकरी पोर होतें; आता नुकतीच त्यांची बदली पुन्हा इकडे कुंज-

पूरला झाली आहे अन् मुद्दाम सगळ्यांना भेटायला अन् जवळच आलेली दिवाळी आनंदानं साजरी करायला ते येणार आहेत. मग आपण सांगावं, मीं त्यांना भेटल्याशिवाय येणं बरं दिसेल का ? अन् आम्हीं सर्वांनी दिवाळी इथं करायची म्हणजे आपण-सुद्धा त्या वेळी रजा घेऊन इथं यायचं. तो. काकांनी आपल्याला अजून पाहयलं नाही, अनायासंच सर्वांच्या भेटी होतील. आपल्याला दिवाळी इथं करण्याचा बेत पसंत नाही हें मला ठाऊक आहे. इथल्या जुन्या विचाराच्या मंडळींत अन् वडील माणसांत आपल्याला हवी तशी स्वतंत्रता मिळायची नाही अन् दिवाळीची मजा अनुभवतां येणार नाही असं मागंच आपण म्हटलं होतं शिवाय यंदाची दिवाळी कशी आनंदांत घालवायची त्याचा बेतहि आंखला होता आपण दोघांनी. म्हणून मीं असं लिहिलेलं वाचून आपल्याला खूप राग येईल हें मला माहीत आहे. पण आता वेळेचं महत्त्व ओळखून आपला राग थोडा आवरून विचार करावा अन् दिवाळीला इथं यावं.

"बाबांचं आपल्याला निराळं पत्र येईलच. पुनःपुन्हा सागतं, की हा बेत आपल्या मनाविरुद्ध असला तरी आल्याशिवाय राहूं नये. आपण आलां नाही तर मला बरं वाटायचं नाही अन् काकांना तरी काय वाटेल ? मग येणार ना ?

आपली

**शारदा.**"

गेले पंधरा दिवस विनायकानें कसे जुलुमावर काढले होते तें त्याचें त्याला माहीत ! शारदा गेल्याच्या चवथ्या दिवशी आपल्या विरहाकुल मनःस्थितीचें वर्णन करून लौकर निघून येण्याचा त्यानें तिला तगादा सुरू केला होता. चतुर शारदा पतिराजांचा उतावळा स्वभाव ओळखून दररोजच्या पत्रांत त्यांचें गोड शब्दांनी समाधान करी आणि

लवकरच येणार असल्याचें आश्वासन देई. पण जसजसे दिवस जाऊं लागले तसतसा विनायकाचा उतावीळपणा वाढत चालला. दोनच दिवसांपूर्वी त्याने तिला बरेच रागाने एक पत्र लिहिलें होतें आणि आता मात्र त्याचा परिणाम होऊन शारदा खास येणार अशी त्याची खात्री होती. पण शारदेच्या या पत्राने तर कळसच केला! "शारदा तर येणार नाहीच; पण उलट मलाच दिवाळीला तिकडे बोलावतें आहे! कशाला? आपल्याला नाही बोवा आवडत तें. 'जावईबोवा, जावई-बापू' म्हणून सदा सगळ्या घरच्या अन् शेजारपाजारच्या शिष्टमंडळींनी भोवती गराडा घालून सतावून सोडायचं! शारदेची दृष्टिभेट व्हायची-सुद्धा मारामार साऱ्या दिवसांत! छट्! किती मजेंत दिवाळी करायचा बेत केला होता यंदा. पण... या काकोबाला कुठून आत्ताच यायला फावलं कोण जाणे!"

मनांतल्या मनांत विनायक खूप जळफळला, संतापला. पण करतो काय बिचारा?

"बरं, पण आता पुढं काय करायचं?" रजेसाठी त्याने कालच अर्ज केला होता अन् ती मंजूर होणार ही खात्रीच होती. "मग शार-देच्या म्हणण्याप्रमाणं जायचं सासुरवाडीला? छे!" विनायकाचं हट्टी आणि शारदेच्या आताच्या पत्राने अधिकच चिडलेलें मन का याला कबुली देणार? "पण मग काय करायचं? दिवाळीसारख्या मंगल प्रसंगीं खाणावळीतलं तें बेचव अन्न खात निरुद्योगीपणानं माशा मारीत उदासवाणं या खोलींत पडून राहायचं?" विनायकाला ती कल्पना असह्य झाली. त्या भरांत पुन्हा जागचा उठून तो अस्वस्थपणाने दारा-पर्यंत आला आणि आता त्याची नजर त्या पाकिटाबरोबरच आंत पड-लेल्या दुसऱ्या कार्डाकडे गेली.

तें कार्ड विनायकाच्या एका स्नेह्याचें होतें. आज पुष्कळ दिवसांपासून त्याच्याकडे 'येईन' असें आश्वासन देऊन अनेक कारणां-मुळे जायचें जमलें नव्हतें. या पत्रांतहि त्याने विनायकाला या खेपेला

नेहमीसारखी थापेबाजी न करतां दिवाळीला सहकुटुंब येण्याविषयी आग्रहाचं आमंत्रण केलें होतं. तें पत्र वाचून विनायकाला आपली काळजी थोडी दूर झाल्यासारखें वाटलें. "बस्स, ठरलं! दिवाळीला बापूकडे जायचं." त्यानें मनाशी ठरवलें. "बसूं दे शारदेला अन् सगळ्यांना वाट पाहात. स्वतःच्या खुषीनाखुषीचा विचार न करतां हिच्या म्हणण्याप्रमाणं वागायला मला अगदी नंदीबैल समजते जशी कांही! अगदी दिवाळीचा दिवस उजाडेपर्यंत आशेनं वाट पाहातील सारीजणं अन् मी आलो नाही असं पाहून अरशी पण होईल साऱ्यांची! अन् शारदा तर..."

शारदेची खोड मोडायची ती कल्पना विनायकाला फारच पसंत पडली. दुपारीच त्यानें आपण दिवाळीला येत असल्याचें पत्रहि त्या मित्राला लिहिलें. पण तें पोस्टांत टाकून परत येत असतांनाच त्याला वाटू लागलें, उगीचच आपण हेकेखोरपणा करतों आहोंत. काय होतं सासुरवाडीला गेलं म्हणून? इथल्यासारखी स्वतंत्रता तिथं मिळणार नसली तरी मेहुण्यांची चेष्टामस्करी, वडील माणसांचं कौतुक अन् थोडा वेळ का होईना– शारदेचा सहवास त्यात कांही कमी मजा नाही .."

भंडावून सोडणाऱ्या या फितुरी विचारांची मनांतून हकालपट्टी करून टाकून आपला निश्चय कायम टिकवितांना विनायक गेल्या चार-सहा दिवसात अगदी जेरीस आला होता. आजच त्याची रजा मंजूर झाली.

दुपारच्या साडेबाराच्या गाडीनें आपल्या मित्राकडे जायचें म्हणून कपड्यांची वगैरे तयारी करीत होता तो. वृत्ति जड झाल्यासारखी अन् चेहऱ्यावर उत्सुकता तर मुळीच नव्हती! जणू कांही कोणी त्याला जुलुमच केला आहे जाण्याचा! पण इतक्यांत टप्टप्... तोच ओळखीचा आवाज अन् नंतर आंत फेकलेलें एक पत्र. हातांतले कपडे तसेच टाकून विनायकाने तें पत्र उचलून घेतलें. आरंभींच कोपऱ्यांतली

' कुंजपूर ' ही अक्षरें पाहातांच " अरेच्या, हें काय ! " असे उद्‌गार त्याच्या तोंडून बाहेर पडले !

शारदेच्या त्या पत्रावरून विनायकाला समजून आलें, की दिवाळीसाठी रजा घेऊन आलेल्या तिच्या काकांना दुसऱ्या दिवशींच कांही जरुरीच्या कामासंबंधी वरिष्ठाची तार आल्यामुळे ताबडतोब कुंजपुरास परत येणें भाग पडलें पण त्यामुळे आपल्या नूतन जामातांच्या भेटीचा लाभ न दवडला जावा यासाठी त्यांनी अशी युक्ति केली, की आपल्या लाडक्या पुतणीला ( शारदेला ) ते जातांना बरोबर घेऊन गेले. म्हणजे विनायकाची सासुरवाडी बदलली एवढंच ' अन् शारदेनें पुढे लिहिलेली हकीकत--

" माझ्या मागच्या पत्राचं उत्तर नाही त्यावरून इकडे येण्याचा बेत आपल्याला आवडला नाही हं उघडच दिसतंय्. पण आता आपल्याला तसं वाटण्याचं कारण नाही. इथं माणसंहि फार नाहीत अन् काका-काकी अगदी सुधारलेल्या मताचीं– आपल्या स्वतंत्रतेला मुळीच आडकाठी येणार नाही कसली. प्रशस्त बंगला, वाटेल तिकडं हिंडायला काकांची मोटर, नाटक, सिनेमा... अगदी सगळं आपल्याला आवडेल असं आहे. "

शारदेच्या या सगळ्या वर्णनाने आतापर्यंत कसाबसा टिकवलेला निश्चय विरघळून गेला. " पुरे आता. उगीच हटवादीपणा करण्यांत अर्थ नाही. " असा त्याने विचार केला.

कुंजपुरास जाणारी गाडी अडीच वाजतां निघणार होती. आता दहा वाजायला आले होते. चार तासांत सर्व आटोपून गाडी गाठायला पाहिजे. " अरे हो, पण आता आधी आपण या गाडीनं येत असल्याबद्दल तार केली पाहिजे म्हणजे शारदा स्टेशनवर येईल. पण आता तार करायला जायचं म्हणजे... "

पण तवढ्यांत त्याला एक युक्ति सुचली.

"अहो माणके–" बाहेर निघालेल्या शेजारच्या एका कॉलेजच्या विद्यार्थ्याला त्याने हटकलें. "कुठं बाहेरच निघालांत ना? मग कृपा करून माझं एक एवढं काम करा." असें म्हणून त्याने एका कागदावर घाईघाईने तारेचा मजकूर लिहिला. तेवढ्यांत त्याच्या मनात आलें, की आपल्या मित्रालाहि येणें होत नसल्याबद्दल कळवलें पाहिजे. म्हणून त्यालाहि तशा अर्थाचा मजकूर तारेंत लिहिला. त्यांच्या या नव्या श्वशुरांचा पूर्ण पत्ता त्याला माहीत नव्हता तो शारदेच्या पत्रावरून पाहून लिहिला अन् तो कागद त्याच्या हाती देऊन दोन तारा करून येण्याची त्याला विनंती केली

गाडी धावत होती व तिच्यापेक्षा वेगाने विनायकाचे विचारहि धावत होते त्याने आपल्या घड्याळाकडे पाहिले, एक वाजायला आला होता "आणखी दोन तासांनी गाडी कुंजपुरास पोचणार. स्टेशनवर शारदा येईलच. बरोबर तिचे काकाहि येतील की काय? कसे काय असतील ते? त्यांच्याशी बोलायला कशी काय सुरवात करावी? प्रथम नमस्कार करायचा तो जुन्या पद्धतीनं करावा की काय?" असे अनेक प्रश्न त्याच्या मनांत गर्दी करीत होते. बाहेर ऊन रखरखत होतें आणि त्याच्या झळा धावत्या गाडीतहि अंगाचें पाणी करीत होत्या. भूकहि लागली होती.

शेवटी गाडी एकदाची कुंजपूर स्टेशनवर उभी राहिली. बरेंच मोठें स्टेशन असावें तें. प्लॅटफॉर्मवरच्या माणसांच्या गर्दीत विनायक आपणाला हवा असलेला ओळखीचा चेहरा कोठे दिसतो तें पाहात होता. बराच वेळ झाला; पण शारदेचा पत्ता नाही! आता काय करायचें? विनायक अगदी गोंधळांत पडला. शारदेला पाहाण्यासाठी त्याने प्लॅटफॉर्मवर इकडून तिकडून खेपा घातल्या; पण व्यर्थ! आता मात्र फजितीची वेळ होती. विनायक या भागांत अगदी नवखा. कुंजपूरची त्याला नांवापलीकडे कांहीच माहिती नव्हती. पण आलेल्या प्रसंगाला तोंड देणें त्याला भागच होतें. त्याच्याभोवती गराडा

घालून "कूली, साहेब ?" म्हणून त्याचें डोकें उठविणाऱ्या हमालां-पैकी एकाच्या डोक्यावर आपलें सामान देऊन तो स्टेशनबाहेर आला. "कुठं जायचं साहेब ?" या गाडीवाल्याच्या प्रश्नाला काय उत्तर द्यायचें आता ? त्याला कुठं जायचें हें माहीत कुठं होतें ? खरेंच, शारदेच्या पत्रांत आहे की पूर्ण पत्ता लिहिलेला त्यानें कोटाचे सगळे खिसे तपासून पाहिले; पण त्याला तें पत्र कांही सापडलें नाही. आता ?–

शेवटी स्मरणशक्तीच्या जोरावर जो पत्ता आठवला तो सांगून स्वारी गाडीत बसली. गाडी चालू लागली.

"जोशीसाहेब इथंच राहातात ना ?" एका सुंदर बंगल्यापुढं गाडी उभी करायला सांगून फाटकापाशी उभ्या असलेल्या माणसाला विनायकाने विचारलें.

"हां, इथंच." असें त्या माणसाचें उत्तर ऐकल्यावर सुटकेचा एक निःश्वास टाकून तो गाडीकडे वळला आणि त्याने गाडीवाल्याला सामान बाहेर काढण्यास सांगितलें. तेवढ्यांत त्या नोकराने आत जाऊन कोणी आल्याची वर्दी दिली असावी. कारण एक पोक्त वयाचे, अंगाने स्थूल असे गृहस्थ लगबगीने फाटकापाशी येतांना त्याने पाहिलें. त्यांचा एकंदर रुबाब बंगल्याच्या मालकाला साजेसाच होता. विना-यकाने एकदा लांबवर दृष्टि टाकून त्यांच्या पाठीमागे तरी शारदा दिसते की काय म्हणून पाहिलें; पण कोणीहि दिसलें नाही ! तेवढ्यांत ते गृहस्थ जवळ येऊन ठेपलेदेखील. ते आपले श्वशुर असावेत हें तर्काने ओळखून त्याने विनयाने खाली वाकून त्यांना नमस्कार केला, त्याचा सुहास्य मुद्रेने स्वीकार करीत ते म्हणाले,

"कसा काय झाला प्रवास ? उन्हाच्या वेळची गाडी पसंत केलीत ?"

"हं. तसा कांही फारसा त्रास नाही झाला."



“ म्हणायचं काय ? ही पाहा घेऊनच आलें आहें बरोबर. ”

" आम्ही वाटच पाहात होतों तुमच्या येण्याची. पण आत्ताच्या गाडीनंच याल अशी कल्पना नव्हती. नाहीतर स्टेशनवर आलों असतों कोणीतरी. "

" म्हणजे ! माझी तार नाही मिळाली ? "

" तार ! नाहीं बुवा ! "

" म्हणजे काय ? तो लेकाचा माणके तार करायला विसरला की काय ? तरीच मला वाटलं असं कसं कोणी आलं नाही ! दुसऱ्यावर विश्वासलं म्हणजे असंच व्हायचं. "

व्हरांड्याच्या पायऱ्या चढून येत असतांना समोरच्या दारांतून कोणीतरी झर्‌कन् आंत गेल्याचा भास झाला. " शारदाच ही ! पण ही लाजते आहे काय अशी ? " असें विनायक मनाशी म्हणतो आहे तेवढ्यांत त्याच्या श्वशुरांनी सांगितलें, " आपल्याला खंडू आपली खोली दाखवील. कपडे काढून तोंड वगैरे धुवा तोंवर चहा येतोच आहे. "

पावलांची चाहूल ऐकतांच विनायकाला वाटलें, शारदाच चहा घेऊन आली असावी. म्हणून त्याने उत्कंठेने दाराकडे पाहिलें तों खंडू गडी म्हणत होता,

" काकासाहेब आपल्याला खाली चहाला बोलावताहेत. "

हिरमुसला होऊन तो निमूटपणें खंडूबरोबर खाली गेला.

" या, बसा ना. " असें त्याला म्हणून काकासाहेबांनी आंतल्या दाराकडे पाहात म्हटलें, " हं मालूताई, येऊं दे चहा. "

" हें काय ! शारदेचं माहेरचं नांव तर कुसुम आहे ! मग ही मालू कोण ? काकासाहेबांनी पुतणीचं आवडतं नांव ठेवलंय वाटतं मालू ?... "

समोरच्या दारावरचा सुंदर पडदा एका गोऱ्यापान हाताने दूर झाला, नेसलेल्या पातळाचा जरीचा पदर ओझरता झळकला. त्या दोन सेकंदांत विनायकाची अधीरता अगदी पराकोटीला जाऊन पोचली! एक स्मितमुखी सुंदर तरुणी मंद पावलें टाकीत पुढे आली ... पण ती शारदा नव्हती! आहे तरी काय हा घोटाळा? आपले डोळे आपल्याला फसवीत तर नाहीत ना! विनायकाला कांहीच समजेना! अस्वस्थ होऊन तो इकडेतिकडे पाहूं लागला.

"ही माझी मुलगी मालती. आणि मालूताई, हे कोण तें तुला ठाऊकच आहे!' असें म्हणून काकासाहेब हसले.

चहापान चालू असतांना काकासाहेब एकटेच बोलत होते म्हटलें तरी चालेल. विनायकाचें त्यांच्या बोलण्याकडे मुळीच लक्ष नव्हतें.

मध्येच त्यांनी कांही विचारलें तर तो नुसता 'हूं' करी.

थोड्याच वेळांत काकासाहेब उठले व म्हणाले, "थोडं काम आहे, जरा वर जाऊन येतों हं."

आता तिथे विनायक व मालती दोघेंच राहिली. विनायकाला कसेंसेंच वाटूं लागलें.

समोरच्या अधोवदना तरुणीकडे पाहाण्याचेंहि धैर्य त्याला होईना. कसाबसा धीर धरून त्याने एकदा विचारलें,

"तुमची ताई कुठं दिसत नाही?"

त्याचा हा प्रश्न ऐकून मालतीने चमकून मान वर केली आणि उत्तर दिलें,

"ताई दुपारींच एका मैत्रिणीकडे गेलीय्."

"मी येणार हें माहीत असून?"

विनायकाचा हा प्रश्न तिला नीट समजला नसावा बुचकळ्यांत पडल्यासारखी चर्या करून ती अडखळत म्हणाली,

" आपण आत्ताच येणार हें नव्हतं ठाऊक. "

" अरे खरंच! यांना आपली तार मिळाली नाही, नाही का!" हें लक्षांत येतांच विनायकाला सगळा घोटाळा उलगडल्यासारखा झाला. तो पुढे म्हणाला,

" मग आता बोलावणं पाठवलंत ना ?"

पहिल्याहून अधिक विस्मयाने त्याच्याकडे पाहात मालती म्हणाली,

" हो, खंडू जाईल. "

नंतर कांहीतरी बोलायचें म्हणून विनायक म्हणाला,

" कॉलेजांत असतां वाटतं ?"

" हो, यंदाच गेलें आहे. "

पुन्हा थोडा वेळ दोघेंहि गप्प.

" गाण्याबिण्याची आवड दिसत आहे ?" कांहीतरी संभाषण चालू ठेवणें भाग आहे म्हणून विचारलेला दुसरा प्रश्न.

" अहो, आवड म्हणून काय विचारतां! चांगलीच नादी आहे. हं मालूताई, पाहुण्यांना ऐकवा ना थोडं कांहीतरी." आंत येत असलेले काकासाहेब विनायकाचा प्रश्न ऐकून म्हणाले.

वडिलांच्या बोलण्यावरून मालती उठली, कोपऱ्यांत ठेवलेल्या हार्मोनियमजवळ जाऊन तिने तिचें झाकण काढलें. आपल्या मधुर आवाजांत एक सुंदर पदहि गाऊन व वाजवून दाखविलें. विनायकला मात्र कशांतच गोडी वाटत नव्हती. उलट काकासाहेबांनी सारखें

आपल्या लेकीचें गुणवर्णन चालविल्यामुळे आणि शारदेच्या नांवाचा उल्लेखहि न केल्यामुळे त्याला पराकाष्ठेचें आश्चर्य वाटत होतें. मालतीचा आणि त्याचा सहवास घडावा म्हणून जो त्यांनी सारखा प्रयत्न चालविला होता त्यामुळे तर तो लज्जेने व संकोचाने अर्धमेला झाला होता.

संध्याकाळ झाली होती.

"मालूताई, पाहुण्यांना घेऊन मोटरमधून फिरून या जरा. श्रीपतीला सांगितलंय मीं गाडी बाहेर काढायला."

"नको बुवा आता, कंटाळा आलाय आज प्रवासानं." पुढच्या प्रसंगाला भिऊन विनायकानेच नकार दाखविला.

"बरं बरं, राहूं दे मग. आपण बाहेरच्या बाजूस बागेंतच गप्पा मारीत बसूं मोकळेपणानं."

तिघेंहि बाहेर बागेंत ठेवलेल्या आरामशीर बाकावर जाऊन बसलीं. काकासाहेबांचें बोलणें चालूच होतें. विनायक मात्र अधून-मधून त्यांना नुसता 'हुं'कार भरीत बागेंतल्या झाडांचें, समोरच्या रस्त्याचें व आजूबाजूच्या बंगल्यांचें निरीक्षण करीत होता.

समोरच्या बंगल्याच्या उघडया खिडकीकडे नजर जातांच त्याला जें कांही दिसलें त्याने तो एवढा चमकला, की जागेवरून उठून उभा राहिला !

त्या खिडकीत शारदा उभी होती अन् त्याच्याकडे रोखूनच पाहात होती. त्याची व तिची नजरानजर होतांच तिने झट्कन् खिडकी लावून घेतली.

शारदा त्या बंगल्यांत कशी ? आपण चुकून भलत्याच ठिकाणीं तर उतरलों नाही ! असेंच दिसतें ! पण आता ही चूक त्यांना सांगा-यची तरी कशी अन् कोणत्या शब्दांत ? खुशाल एवढा वेळ त्यांचा

पाहुणचार घेतला !– छे ! छे ! म्हणतील तरी काय हे आपल्या मूर्ख-पणाला ?

पाहुणे भांबावल्यासारखे एकाएकी चमकून उठलेले पाहून काका-साहेब म्हणाले,

" काय हो, काय झालं ?"

" अं ...कांही नाही !... मला वाटलं...अं . . माझी थोडी चूक .."

" प्रकृति तर ठीक आहे ना ?" पाहुण्यांची घाबरलेली चर्या व बोलतांना उडालेली तारांबळ पाहून काकासाहेबानी विस्मयाने त्यांच्या-कडे पाहात विचारलें.

अंगांतली सगळी विचारशक्ति आणि संयम यांचा एकवटून उप-योग करून विनायकाने आपली वृत्ति कशी तरी स्थिर केली आणि पुन्हा खाली बसत शक्य तितक्या शांतपणाने विचारलें,

" हा समोरचा बंगला कुणाचा ?"

" तोहि जोशांचाच. एका व्यापारी कंपनीतले बडे अधिकारी गृहस्थ आहेत ते. नुकतेच दोन महिन्यांपूर्वी इथं बदलून आले आहेत. कां ?"

" अन् मघाशी या खिडकीत एक तरुण स्त्री उभी होती ती ."

" हं हं ! ती पुतणी असेल तात्यासाहेबांची. दिवाळीसाठी इथं आणलीय् वाटतं तिला." पाहुणे कशामुळे मघाशी गोंधळले तें काकासाहेबांना आता समजलें. पण म्हणूनच त्यांचें तसें वागणें आणि एका अपरिचित मुलीविषयी त्यांनी चालविलेली चौकशी त्यांना आवडली नाही.

" तिला जरा बोलावून घेतां का इथं ?"

आता मात्र पाहुण्यांच्या धाष्टर्याची कमाल झाली ! या माणसाला कांही सभ्यपणा अन् शिष्टाचार तरी समजतो की नाही ? काकासाहेब मनांतल्या मनांत खूपच रागावले; पण पाहुण्यांनी शिष्टाचार सोडला तरी त्यांना तसें करतां येत नव्हतें ना ! म्हणून बाह्यतः शक्य तितक्या शांतपणाने अन् समजुतीच्या स्वरांत त्यांची कशी कानउघाडणी करावी याचा ते मनाशीं विचार करीत असतांनाच पाठीमागून कोणी आल्याची त्यांना चाहूल लागली म्हणून त्यांनी वळून पाहिलें तों समोरच्या जोशांची ती पुतणीच बागेच्या फाटकांतून आंत येत होती.

" या कुसुमताई, या वेळीं इकडे कुणीकडे ? " मालतीनें शिष्टाचारास अनुसरून शारदेचें स्वागत केलें.

" कुसुमताई, आलीस का ? बरं झालं. हे आमच्या बंडूचे स्नेही मनोहरपंत देशमुख. सहज मजेनं चार दिवस राह्यला म्हणून आले आहेत. मालतीलाहि सुटी होती, अनायासं परिचय होईल. "

ओठांबाहेर फुटणारें हसूं आंत दाबीत विनायकाकडे दृष्टिक्षेपहि न करतां मालतीच्या पाठीवर थाप मारीत शारदा म्हणाली, " अस्सं, पाहुण्यांच्या धांदलींत होती होय मालूताई ! तरी म्हटलं दुपारीं फिरकली कशी नाही मुळीच ! "

" शारदे ! " तिच्या त्या वागण्यामुळं चिडून मनावर ताबा ठेवणें अशक्य झाल्यामुळे विनायक ओरडला.

" चेष्टेला कांही काळवेळ अन् विचार पाहावा लागतो. तूं स्टेशनवर न आल्यामुळं हा एवढा घोटाळा झाला. "

" पण स्टेशनवर यायचं कसं ? येणं कांही अपरिहार्य अडचणीमुळं होत नाही अशी जर आपली तार आली, तर... "

" काय म्हणतेस ? "

" म्हणायचं काय ? ही पाहा घेऊनच आलें आहे बरोबर. आपल्याला इथं पाहिलं तेव्हाच मला वाटलं, की कांहीतरी घोटाळा झालाय्. म्हणून मुद्दाम आलें लगेच."

" अरे ! खरंच, घाईघाईत मी दोन्ही तारांचा मजकूर खरडून दिला त्या माणक्याजवळ, त्यांत पत्त्यांची अदलाबदल झाली वाटतं !"

" म्हणजे कुसुमताई, आहे तरी काय हा घोटाळा ? हे मनोहरपंत ना, नव्हेत का ?"

मग हा घोटाळा झाला कसा हें विनायकानें सविस्तर सांगितलें.

तेवढ्यात दाराशी एक मोटार येऊन उभी राहिली आणि त्यांतून खाली उतरून एक तरुण गृहस्थ विचारूं लागला,

" जोशीसाहेब इथंच राहातात ना ?"

काकासाहेबांनी पुढे होऊन त्या तरुणाला एकदा आपादमस्तक न्याहाळून पाहिलें आणि म्हटलें,

" होय, पण आधी आपलं नांव काय ? आपण कुणाकडून आलांत ? अन् कोणते जोशी पाहिजेत आपल्याला ?"

त्यांच्या या प्रश्नाच्या सरबत्तीचा मनोहरपंतांना त्या वेळी चमत्कार वाटला असला तरी पुढे दिवाळीत दोन्ही जोशांच्या घरची मंडळी जेव्हा फराळासाठी एकत्र जमली तेव्हा त्या सर्व प्रकाराच्या आठवणीने जो प्रचंड हशा तिथे पिकला तो सांगतां पुरवत नाही !



# मावशी

टांग्यांत बसतांना माझे डोळे पाण्याने भरून आले होते. तें पाहून टांग्यापाशी मला निरोप द्यायला आलेला बापू म्हणाला, " किती मोठया झाल्या तरी बायकांची माहेरची ओढ कांही कमी होत नाही. तूंसुद्धा शेवटीं रडायला लागलीस ना चंपूताई ! तिकडे नारायण-राव आज आठ दिवसांच्या विरहानं व्याकुळ होऊन तुझी वाट पाहात असतील अन् तुझा जीव नव्या नवरीसारखा अजून माहेरच्या मायेंतच गुंतून राहिला आहे .."

बापू आणखीहि कांही बोलला असता; पण तेवढयांत टांगा हालला. बापूने " अच्छा, बराय् ! पत्र पाठव हं पोचल्याचं .." असें म्हटलें, त्याला मीं मानेनेच होकार दिला. दाराच्या चौकटीला एक हात देऊन मावशी उभी होती. तिचे क्षीण डोळे माझ्याकडे पाहात

होते. मान हालवून मीं तिचा पुन्हा एकवार निरोप घेतला अन् टांगा चालूंहि झाला.

गाडींत बसल्यावरहि मला मावशीचे ते शब्द फिरून फिरून आठवत होते. " पोरी, यांच्या राज्यांत मी राणी होतें; पण आज... पाहुणी ..पाहुणी कसली– घासभर अन्नाची आश्रित केवळ या घरची .. "

आज कितीतरी दिवसांनी मी मावशीकडे गेलें होतें. ऑगस्ट महिन्यांत बापू कांही कामगिरीनिमित्त आमच्या गावीं आला होता. तेव्हा त्याला आम्ही आमच्याकडेच उतरून घेतलें होतें. जातांना त्याने सहजच म्हटलें, " चंपूताई, आता तूंहि आमच्याकडे आलं पाहिजे बरं का. दिवाळी जवळच आली आहे. दिवाळीलाच येईनास मग ? "

मलाहि वाटलें, कित्ती दिवस झाले आहेत मावशीला भेटून ! जावें आता म्हणजे भेट होईल तिची. लहानपणीं मला तिचा अतिशय ळळा होता. मावशीला लागोपाठ सहा मुलगे झाले; पण मुलगी एकहि नव्हती त्यामुळे ती मला आपली मुलगीच समजे. आमचीं घरें जवळजवळ असल्यामुळे माझें आठवड्याचें न्हाणें-माखणें, मधल्या वेळचें खाणें मावशीकडेच व्हायचें. रात्रीची निजायला सुद्धा मी कधीकधी मावशीकडेच असायची. आई थट्टेने म्हणायचीसुद्धा नेहमी. " अक्का. तूं हिला दत्तक घेऊन टाक पाहूं. "

पण पुढे मावशीच्या यजमानांची धुळ्याला बदली झाली. ती गेली तेव्हा किती रडलें मी ! अन् तिची पण डोळ्यांतलें पाणी परतवितांना पुरेवाट झाली '

प्रथम प्रथम मी मावशीला दर रविवारीं पत्र लिही. मावशीला वाचतां येत होतें; पण लिहायला जमत नसे. तरी तिनें आपल्या एखाद्या मुलाकडून माझ्या पत्राचें उत्तर घालावें. मला माझ्या अभ्या-सांतल्या अगर इतर कोणत्या हुषारीबद्दल शाबासकी द्यावी.

पण पुढे वाढत्या वयाबरोबर माझ्या मित्रमैत्रिणींचा परिवार वाढला, मनाला गुतवून ठेवणारे इतर अनेक व्यवसाय उत्पन्न झाले, अन् मावशीबद्दलचा माझा जिव्हाळा अन् आकर्षण कमी कमी होऊं लागलें. आठवड्याचीं पत्रें दोनदोन महिन्यांवर जाऊन पुढे अजिबात बंद झालीं !

पुढे माझें लग्न ठरलें. लग्नांत मावशी आली होती. तिच्या कुशींत शिरायला अगर तिने पानांत काढून ठेवलेला गोड घास खायला मी पूर्वीची परकरी चंपू राहिलें नव्हतें. तरीपण फारा दिवसांनी तिची भेट झाल्यामुळे मला खूप आनंद वाटला एवढें खरें.

लग्नानंतर तर काय, मी माझ्या संसारांत रमून गेलें. मावशीच्या जीवनांतहि पुष्कळ घडामोडी झाल्या होत्या. तिचे पतिराज कांही आजार होऊन वारले. धाकटी दोन मुलेंहि तापाच्या साथींत दगावलीं. मधले कांही दिवस तिला मोठे वाईट गेले. पण तिने धीर धरून थोरल्या मुलाचें शिक्षण पुरें केलें. एंजिनियरिंगचा डिप्लोमा मिळून त्याला नुकतीच नोकरी लागली आणि मावशी मुलाच्या रोजगाराच्या गावीं राहायला आली.

या गोष्टी कधीतरी वर्षाकाठी येणाऱ्या तिकडच्या पत्रांतून मला त्रोटकशा समजत.

बापू आला तेव्हा जुन्या आठवणी जाग्या झाल्या होत्या. मावशीला एकदम भेटावें ही इच्छाहि प्रबळ झाली आणि बापूचें आमंत्रण हेंच निमित्त समजून मी छोट्या कालिंदीला फक्त बरोबर घेऊन दिवाळीला मावशीकडे आलें.

कितीतरी दिवसांनी मी तिला पाहात होतें ! बरीच थकली होती ती आता. तिच्या डोळ्यांतलें तें करारीपणाचें आणि स्वाभिमानाचें तेजहि नाहीसें झालें होतें. मीं वाकून नमस्कार करतांच डोळे भरून आणून तिने मला आशीर्वाद दिला. कालिंदीला जवळ घेऊन कुरवाळलें.

"तुझ्यासारखी दिसतीय् ग हुबेहूब. लहानपणीं अशी दिसत होतीस तूं." तिच्याकडे कौतुकाने पाहात ती म्हणाली.

आम्ही इकडच्या तिकडच्या गोष्टी बोलत होतों तोंवर बापूची बायको कुठेशी बाहेर गेली होती ती परत आली. बापूच्या लग्नाला मी अडचणीमुळे येऊं शकलें नव्हतें त्यामुळे तिला आज मी प्रथमच पाहात होतें. बापूने तिला माझी ओळख करून देतांच तिने हसून पुरुषी पद्धतीने मला नमस्कार केला.

"अग, वडील नणंद आहे ती तुझी! खाली वाकून नमस्कार करायचा होतास." मावशीने हळूच म्हटलें.

उषेने—बापूच्या बायकोने—नापसंतीच्या नजरेने एकवार तिच्याकडे पाहिलें. मावशी ओशाळी झाली. मलाहि जरा चमत्कारिक वाटलें. पण पुढे अितर बोलण्यांत निघून तो प्रसंग आम्ही विसरून गेलों.

बापूची बायको थोडीफार इंग्रजी शिकलेली आणि छानछकीची आवड असणारी अशी होती. बापूला पगारहि बऱ्यापैकी मिळत असल्याने दोघेंहि नवराबायको मोठ्या ऐटींत राहात असत. बरोबरीच्या इतर मंडळीमध्ये मिसळणें, खेळायला अगर फिरायला जाणें, चहापार्टी देणें इत्यादि आधुनिक जीवनांतले सारे प्रकार त्यांच्याकडेहि चालू असत. सुखांत चालला होता त्यांचा संसार. मलाहि हें सारें बघून आनंद झाला.

पण एक गोष्ट मात्र माझ्या मनाला प्रथमपासून टोंचत होती. आणि ती म्हणजे मुलाच्या संसारांत मावशीची झालेली केविलवाणी स्थिति!

बापू आणि उषा स्वभावाने तशीं कांही वाईट होतीं अगर मावशीला जाणूनबुजून त्रास देत असत असेंहि नाही. पण बापू मिळवता आणि उषा त्याची पत्नी म्हणून त्यांच्या इच्छेने तिथलें प्रत्येक पान हालावें आणि मावशीच्या मताला अगर बेताला कोणीं पुसूं नये अशी अवस्था व्हायची.

नर्कचतुर्दशीच्या दिवशीचीच गोष्ट आमच्या सगळ्यांच्या आघोळी उरकल्यावर फराळाची पानें मांडण्याच्या गर्दीत आम्ही होतों. बापूला आवडतात म्हणून ताजे चिरोटे मावशी तळीत होती. बापूनें आपले एकदोघे मित्रहि फराळाला बोलावले होते. समोरच्या वाड्यांत राहाणारी उषेची चुलत बहीण नी भाची यांना तिनेंहि आमंत्रण दिलें होतें करंडीतून वाढायसाठी म्हणून एका ताटांत चकल्या काढून घेत असलेल्या उषेला मावशी म्हणाली

अग, पलीकडच्या त्या रमाकाकूंच्या दोघातिघा नातवंडांना बोलाव फराळाला. बिचाऱ्यांची आई आजारी आहे म्हणून कांहीसुद्धा तळण तळलं नाही घरांत असं मला काकू म्हणत होत्या काल देवळांत भेटल्या तेव्हा. लक्ष [illegible]री कसं लागणार कुणाचं सणावाराकडे ? म्हणून म्हणतें आपण बोलवावं पोरांना. '

" इश्श ! आत्ता नको बाई ! चार बरोबरीची मंडळी जमणार तिथं त्या पोरांची लुडबुड कशाला ? मग फराळाचं द्यावं वाटलं तर ताटांत येवढं नेऊन. "

उषेच्या या उत्तरावर मावशी कांही बोलली नाही. पण तिची चर्या उतरून गेली होती. त्याच्या आधी माझ्याशी अिकडच्या तिकडच्या कांही गोष्टी ती बोलत होती त्याहि बंद झाल्या !

हसतखेळत फराळ उरकलं पण माझें लक्ष सारखें मावशीच्या उदासवाण्या चेहेऱ्याकडे होतं. फराळ मला गोड लागेना.

मला लहानपणीं पुरणपोळी फार आवडायची. मावशीनें कधीहि पुरण घातलें तरी मला त्यांतली पोळी तिनें राखून ठेवली नाही असं कधी व्हायचं नाही. धुळ्याला गेल्यावर तर तिकडून येणाऱ्या कोणा ओळखीच्या माणसाबरोबर देखील तिनें मला पोळ्या पाठवल्या होत्या. म्हणून पाडव्याच्या दिवशीं पुरण घालायचं असा मावशीनें बेत केला

अंग धुऊन चुलीपाशीं गेल्यावर तिने उषेला विचारलें, " अग, डाळ नाही का काढलीस पुरणाची ? "

" पुरण नको बाई ! चक्का सांगितलाय् आणायला. "

" अग पण . " एवढें अर्धवट बोलून मावशी गप्प राहिली. जणु अधिक चिकित्सा करून पदरीं पडणारा अपमान तिने टाळला असावा.

दुसऱ्या दिवशी सर्वांनी सिनेमाला जायचं असें बापूनं ठरवलें. मावशी म्हणत होती, " मी कशाला येऊं ? मला कांही त्यांत फारसं समजायचं नाही. मी मुरलीधराच्या देवळांत कथेला जाईन आपली. "

पण मी आणि बापूनेहि तिला बराच आग्रह केला तेव्हा ती यायला तयार झाली. आम्ही सारीं निघालों. बापू नी उषा पुढे जोडीने चालत होतीं. मीं जरा मागे रेंगाळून मावशीच्या चालीने चालत होतें.

कोपऱ्यावर एक लंगडी भिकारीण बसली होती. येणाराजाणारा-पुढे हात पसरून " शेठ, लंगड्याची दया करा मायबाप ! " अशी तिची याचना सुरू होती. मावशीने तिच्याकडे पाहातांच " आईसाहेब, तुमची धर्माची लेक हाय मी, काय तरी धरम करा ! " अशी तिने केविलवाणी विनंती केली. मावशीचे पाय क्षणभर तिथं घुटमळले. तिने " अरे बापू ! " अशी अस्पष्ट हाकहि मारली. बोलण्याच्या नादांत असलेल्या बापूने ती अर्थात् ऐकली नाही आणि ती मग झटकन् पुढे निघाली. पण त्या गल्लीच्या कोपऱ्यावरून वळेपर्यंत तिने तीन-चारदा तरी मागे वळून पाहिलें असेल.

दिवाळी संपली आणि मीं लवकरच परत जाण्याची गोष्ट काढली. मावशीच्या मनांत मी आणखी थोडे दिवस राहावें असें होतें. " आलीस गडबडींत अन् तशीच चाललीसहि... " असं ती सारखी मला म्हणत होती. तिच्या मनांत बापूने मला आग्रह करावा असें होतें. म्हणून " अरे बापू, चंपू जाते म्हणतेय्. " असें तिने त्या दिवशीं

जेवतांना त्याला म्हटलें. पण बापूराव काय? " जातय् होय? कधी?" असें त्याने उलट विचारलें. मावशीने मग मला अधिक आग्रह केला नाही.

फारा दिवसांनी मी माहेरपणासाठी आलेली, तेव्हा मला एखादी चांगली वस्तु– लुगडेंबिगडें घ्यावें– अशी मावशीची इच्छा. तिने हळूच एकदोनदा तसें म्हटलेलेंहि मी ऐकलें. पण बापूने त्याकडे फारसें लक्ष दिलें नाही.

जायच्या आदल्या दिवशी ती नी मी बराच वेळ बोलत बसलों होतों, तेव्हा मात्र ही गोष्ट माझ्याजवळ बोलल्याशिवाय तिला राहा-वलें नाही. " जाऊं दे ग मावशी! तुझं कांहीतरीच! मला माझ्या घरी कमी का आहे? अन् उषनं परवा मला कापड दिलंय् की ब्लाउझला झालं तर!"

" तसं नव्हे ग! बापूला काही दुसरी बहीण नाही अन् तुझा लहाणपणापासून लळा आहे मला; तेव्हा आपलं वाटतं मनाला."

" कांही वाटून घेऊं नको. तुझा आशीर्वाद आहे ना, तीच मोठी देणगी आहे सगळ्यांत. अन् मावशी, मीच एक लहानशी भेट देणार आहे तुला. नाही म्हणू नको" मी तिच्या हातांत पांच रुप-यांची एक नोट ठेवून म्हटलें.

" हें ग काय? नी कशाला?" तिने आश्चर्याने विचारलें.

" कांही नाही. उगीच! तुला त्या मधुकऱ्याला धोतरं घ्यायचीं आहेत ना चातुर्मासाच्या उद्यापनाची? दुपारी बापूचं अन् तुझं चाललेलं बोलणं ऐकलं मीं. त्याला सवड नाही असं तो म्हणाला, म्हणून मी देतें आहे. तो जसा तुझा मुलगा, तशीच मी मुलगी नाही का? म्हणून."

" अगबाई! मुलगी नी मुलगा यांची बरोबरी कशी होईल? मुलगी हें दुसऱ्याचं धन. तिचे पैसे घेऊन त्याचा दानधर्म केला तर तो खरा होईल का? ठेव हे तुझे तुझ्याजवळ. दिलेन् त्यानं तर घेईन; नाहीतर राहिलं!"

तिने ती नोट परत माझ्या हाती दिली. तिच्या मुद्रेवर अगतिकता दिसत असली तरी त्यांत निश्चयाची तीव्र छटाहि दिसत होती. मीं मग तिला आग्रह केला नाही.

जायच्या वेळेला मी तिला नमस्कार करायला गेलें तव्हा सद्गदित स्वरांत तिने आशीर्वाद दिला आणि म्हटलें, " निघालीस ? आणखी चार दिवस राहा असं म्हणणार होतें. पण कशाला ? मी जिथं परक्यासारखी राहातें आहे तिथं तुला...! त्यांच्या राज्यांत मी राणी होतें; पण आज पाहुणी .. पाहुणी कसली, घासभर अन्नाची आश्रित..."

तिच्या अर्धवट बोलण्यांत तिच्या अंतःकरणांतला सारा आशय साठविला होता.

माझ्या मनांत आलें, खरेंच, जिने पतीच्या राज्यांत अनिर्बंध सत्ता गाजविली; आपला बेताचा प्रपंच संभाळून इतरांना होईल ती मदत केली; मैत्रिणींना, आप्तेष्टांना दिलें-घेतलें; यथाशक्ति दानधर्म केला; अशा मावशीसारख्या स्त्रीला मुलाच्या राज्यांत दुसऱ्याच्या ओंजळीने पाणी प्यायची पदोपदीं पाळी आली म्हणजे किती दुस्सह होत असेल ?

राणी ! ! पण खरोखर, तेव्हा तरी ती राणी होती हें खरें का ? वेडी मावशी ! तेव्हाचें तिचें राज्य तरी स्वतःच्या हक्काचें होतें का ? नव्हतें. तेव्हाच्या सत्ताधीश राजाच्या कृपेंतली मानकरीण होती ती हेंच खरें.

ती राणी होती खरी; पण राज्याची नव्हे, तर राजाची. राजा गेला, राणीपणहि गेलें ! मावशीसारख्या साऱ्या स्त्रिया आज नुसत्या राजाच्या राण्या आहेत आणि दुसऱ्याच्या कृपेवर अवलंबून असलेलें हें राणीपद भोगण्यांतच सुख मानताहेत ! त्यांना हें कळेल कधी ? अन् त्या खऱ्याखुऱ्या राज्याच्या राण्या कधी बरे होतील ?



# दिवाळी

दिवाळीची सुट्टी जवळ आलेली. कन्यामंदिरांतल्या मुलींचे चेहरे आनंदाने फुलून गेलेले दिसत होते. सहामाही परीक्षा दोनच दिवसांनी सुरू होणार होती. ती संपायला आठ दिवस लागायचे होते. नंतर चार दिवसांनी निकाल— म्हणजे सुमारें पंधराच दिवस राहिले सुट्टीला. या विचाराने प्रत्येकीच्या चेहऱ्यावर प्रसन्नता दिसत होती. परिक्षेच्या अभ्यासाच्या विचारापेक्षाहि घरीं जाण्याचे विचारच त्यांच्या मनांत अधिक गर्दी करीत. ठिकठिकाणीं मुलींचे कंपू अभ्यासाला म्हणून बसत आणि गोष्टीवरून गोष्टी निघतां निघतां अभ्यास बाजूला राहून घरीं जायला कोणत्या गाडीने निघायचें, सुट्टी कशा तऱ्हेने घालवायची, खरेदी कायकाय करायची, एकमेकींना पत्रें केव्हा पाठवायचीं याच्याच वाटाघाटी होत.

आताहि अशाच चारपांच मुली वसतिगृहाच्या मागच्या बाजूला व्हरांड्यांतील एका कोपऱ्यांत जमल्या होत्या. प्रत्येकीच्या हातांत नांवाला एकेक पुस्तक होतें; पण गप्पा चालल्या होत्या सुटीबद्दल. इतक्यांत एका मुलीने डोळ्याने कांहीतरी इशारा दिला. बाकीच्या मुली काय समजायचें तें समजल्या. प्रत्येकजण आपापल्या जागीं थोडीशी सावरून बसली. दोघीतिघींनी पुस्तकांत डोकें खुपसलें तर एकजण दुसरीला अभ्यासांतले कांही प्रश्न विचारूं लागली. एखाद्याला वाटावें, काय मुली अभ्यासांत दंग झाल्या आहेत ! आणि हें सर्व करतांना प्रत्येकीची चोरटी नजर समोरून येत असलेल्या बाईच्या चेहऱ्याकडे लागली होती. बाईच्या लक्षांत मुलींची ही शिताफी आली नाही असें नाही. परंतु मुलींच्या मनोवृत्तीची त्यांना चांगली कल्पना असल्यामुळे "काय ग ? अभ्यास अगदी जोरांत चाललाय् ना ? सगळ्यांनी पास व्हायला हवं बरं का !" असें म्हणून त्या पुढे निघून गेल्या. तशी एकजण म्हणते, ".खरंच, आपल्या बाई किती प्रेमळ आहेत, नाही ग ?" दुसरी म्हणाली, "होय बाई !" अन् मग थोडा वेळ बाईच्या चांगुलपणाच्या वर्णनांतच गेला.

होतांहोतां परीक्षा आटोपली. निकालहि लागला. परीक्षा सहामाही असल्यामुळे नापास मुलींची तोंडं आरंभी थोडी वाईट झाली, तरी लवकरच त्या पुन्हा उत्साहाने इतर मुलींत मिसळल्या. निघायची तयारी सुरू झाली. सामानाची बांधाबांधी करणें, एकमेकींचे पत्ते टिपून देणें यांची घाई झाली. थट्टामस्करीला तर जसा ऊतच आला होता !

मालती आपल्या खोलींतल्या एका खिडकीशीं उभी राहून मुलींची ही धावपळ कौतुकाने पाहात होती. बघतां बघतां तिचा चेहरा गंभीर झाला. मनांतील विचारांची खळबळ असह्य झाल्यामुळेच की काय तिने आपले डोळे अर्धवट मिटल्यासारखें केलें आणि ती जवळच्याच एका खुर्चीवर टेकली. तिच्या डोळ्यांपुढून गतकालचा स्मृतिपट सरकत होता. एक वेळ तिनेहि ही विद्यार्थी-दशा अनुभविली होती.

दिवाळीची सुट्टी आली म्हणून वाटणारा उतावळा आनंद उपभोगला होता; पण ..पण...एक दिवाळी अशी आली, की तिने मालतीच्या सर्व आशांचा, आनंदाचा चक्काचूर करून टाकला. तिची ही आठवण ताजी होऊन तिच्या अंतःकरणांत कालवाकालव झाली.

मॅट्रिकच्या वर्गांत होती तेव्हा ती. एक दिवस शाळेंतून घरी आली तोंच आईने तिला सांगितलें, " मालू, तोंडबिंड धुऊन तयार हो. बघायला यायचेत तुला ! "

मालूला हा प्रकार कांही नवीन नव्हता. गेल्या वर्षापासूनच तिच्या वडिलांनी तिच्याकरिता स्थळें पाहायला सुरवात केली होती. त्यामुळे वधूपरिक्षेकरिता तयार होणें ही एक तिच्या सरावांतलीच गोष्ट होती. झटपट केस विंचरून, तोंड धुऊन, लुगडें बदलून ती तयार झाली. पाहायला येणारी मंडळी आली आणि रीतीप्रमाणे चार प्रश्न विचारून हातांत खाऊ देऊन गेली. मुलगी पसंत पडली. हुंडा, करणी सर्व नक्की झालें आणि सुमुहूर्तावर मालतीने माधवरावांच्या गळयांत माळ घातली. माधवराव त्या वेळी नुकतेच बी. ए. होऊन कायद्याचा अभ्यास करीत होते. त्यांचे वडील त्यांच्या लहानपणीच निवर्तले असून त्यांचे थोरले चुलते घरचे कर्ते होते. मोठा रागीट आणि हेकेखोर म्हातारा होता तो. त्याच्या मनाविरुद्ध कांही बोलण्याची अगर वागण्याची घरांत कुणाचीच प्राज्ञा नव्हती. सध्या त्यांच्या रागाचा रोख मालतीवर होता. कारण ती घरांत नवीनच आलेली असल्यामुळे या खाष्ट मामंजीच्या स्वभावाचा अंदाज तिला लागलेला नव्हता. त्यामुळे तिच्या हातून कांही बारीकसारीक चुका होत आणि तेवढंच निमित्त म्हाताऱ्याला पुरें होई. त्याला तिच्या या वागण्यांत उद्धटपणा दिसे. घरांतील इतर माणसेंहि मालतीला तिच्या चुका अगोदरच समजावून देण्याऐवजी परभारेंच म्हाताऱ्याच्या संतापाला एक माणूस मिळतें असें वाटून उलट त्या चुका त्याच्या मुद्दाम नजरेस आणण्याचा प्रयत्न करीत.

आजवर आईबापांच्या प्रेमळ सावलीत वाढलेल्या मालतीला या सर्व प्रकारामुळे अगदी घाबरून गेल्यासारखें झालें होतें. तरीपण ती स्वभावाने शांत असल्यामुळे सर्व त्रास सोसून समाधानाने राहात असे.

इतक्यांत तिच्या आईला बरें वाटत नाहीसें झालें. घरांत करायसवरायला जवळचें असें दुसरें कोणी नसल्याने तिचे वडील तिला न्यायला म्हणून आले. पुष्कळ आढेवेढे घेऊन एकदाची मालतीला जाण्याची परवानगी मिळाली. दिवाळी जवळच आली असल्याने जावई-बुवा आणि इतर मंडळी दिवाळसणाकरिता येणार होतीच. त्यांच्याच-बरोबर ती परत येईल असें ओझरतें तिच्या वडिलांनी बोलून ठेवलें.

पण दिवाळी चार दिवसांवर आली तरी मालतीच्या आईच्या दुखण्याला उतार पडेना. दिवाळसणाचा बेत अर्थातच रहित झाला. सासरच्या मंडळींनी खूप वाट पाहिली आणि आता बोलावणें येत नाही अशी खात्री झाल्यावर तिच्या मामंजींनी मालतीला ताबडतोब पाठवून देण्याबद्दल पत्र लिहिलें.

" मालू, आता कसं करायचं ?" तिचे वडील म्हणाले

" बाबा, आईला जर इतकं बरं नाही तर मी कशी जाऊं ? त्यांना पत्र लिहा तसं !"

" मला नाही वाटत असं लिहून त्यांची समजूत पटेल असं ! पण तुझं म्हणणंच आहे तर लिहितों. पण म्हातारा त्यामुळं रागावेल मात्र."

आणि झालेंहि खरोखर तसेंच. दोनच दिवसांत मालतीला न्यायला म्हणून तिच्या सासरहून एक माणूस आला.

त्याच्याबरोबर पत्र आलें होतें की, " तुम्हांला जरी नांवलौकिकाची अन् बऱ्यावाइटाची चाड नसली तरी आम्हांला आहे. लग्न

झाल्यावर पहिलीच दिवाळी अन् तिला असा नाट लागायला नको. सूनबाईला पाठवून द्यावी. आम्ही इथं सण साजरा करूं."

हें पत्र पाहून मात्र मालतीचे वडील म्हणाले, "तूं आपली जा. आमचं काय व्हायचं असेल तसं होईल."

मालतीला तर आपल्या सासऱ्याच्या या हेकेखोरपणाचा खूप राग आला. पण करते काय? एकीकडे आईची प्रकृति आणि दुसरीकडे सासऱ्याचा राग! काय करावें हेंच तिला सुचेना! पण शेवटी कांही विचार करून ती म्हणाली,

"बाबा, मामंजीचा राग आज ना उद्या नाहीसा होईल. पण आईच्या प्रकृतीचं तसं नाही. रागावून तरी ते काय करतील? चार शब्द बोलतील, एवढंच ना? बोलू देत, मी सोशीन तें. म्हणून त्याला भिऊन आईला अशा आजारी स्थितींत टाकून जाऊं? छे! माझ्यानं नाही होणार!"

"बघ बाई! तुझा तूं विचार कर. मला तर कांहीच सुचेनासं झाल आहे."

मालतीने आपला निश्चय बदलला नाही. बोलवायला आलेला माणूस एकटाच परत गेला.

०००

"बाबासाहेब, आपण उगीच गैरसमज करून घेत आहांत. ती वेळच तशी होती म्हणून मीं तिला ठेवून घेतलं. माझ्या या चुकी-बद्दल तिला कां शिक्षा करतां? पुन्हा कधी तिला आमच्याकडे पाठवूं नका वाटलं तर! पण असं कांही करूं नका." मालतीचे वडील दीन-वाणीने व्याह्यांची विनवणी करीत होते.

"मीं तुम्हाला एकदा सांगितलं ना, तुमच्या मुलीची आम्हांला गरज नाही म्हणून? म्हणे तिची कांही चूक नाही यांत! तिला एवढं समजायला नको होतं का, की आपल्या घरचं बोलावणं आलं आहे तर

मुकाट्यानं निघून यायचं. एवढं माहेरचं प्रेम– तर आता राहूं दे तिथंच ! एकुलती एक मुलगी, तुम्हाला तरी जड आहे थोडीच !"

" पण बाबासाहेब !. ."

" मीं एकदा सांगितलं तेंच शेवटपर्यंत. उगीच पुनःपुन्हा मला बोलायला लावू नका." असें म्हणून डोकीवर पागोटं ठेवून व्याह्यांच्या विनवणीकडे लक्ष न देतां बाबासाहेबांची स्वारी बाहेर निघून गेली.

कपाळाला हात लावून मालतीचे वडील तेथेच बसले होते. ओसरीच्याच एका कोपऱ्यांत मालती चोरट्यासारखी उभी होती. घरांत इतकी माणसें वावरत होती; पण त्यांपैकी एकजणहि त्या बाप-लेकीकडे ढुंकूनहि पाहात नव्हतं ! काय करावें हेंच त्यांना समजेना !

मालतीला घेऊन तिचे वडील परत आले. तेव्हापासून त्यांची स्थिति एखाद्या भ्रमिष्टासारखी झाली होती. एकुलती एक मुलगी, तिच्या सुखाकरिता म्हणून आपल्या गरिबीचा विचार न करतांहि त्यांनी तिला चांगलें स्थळ पाहिलें; होता नव्हता तो पैसा खर्च केला आणि शेवटीं तिच्या दुर्दैवाकडे पाहून त्यांच्यावर मनांत झुरण्याची पाळी आली. तशांत त्यांना समजलें, की मालतीला कांही दिवस लोटलेले आहेत. शेवटी विचार करतां करतां त्यांना कल्पना सुचली. ती अशी, की मालतीने आपल्या पतीची भेट घ्यावी आणि त्यांचं मन वळवून मालतीने आणि त्यांनी स्वतंत्र संसार थाटावा.

मालतीला ही कल्पना पसंत पडली. माधवराव शिक्षणाच्या निमित्ताने एकटेच परगावी राहात असल्याने त्यांची भेट घेणेंहि सोपें होतं. मोठ्या आशेने आणि विश्वासाने दोघेजण तातडीने त्यांना भेटायला गेलीं. मालतीने पतीच्या पायांवर डोकं ठेवून आपली सर्व स्थिति निवेदन केली आणि पदरांत घेण्याची विनंती केली. तिच्या वडिलांनीहि सांगितलें की, " माधवराव, मुलगी आम्हीं तुमच्या हातीं

दिली आहे. तिला बाकीच्यांनी दूर लोटली तरी तुम्हाला तशी लोटतां येणार नाही. तिला पदरांत घ्या. तुमच्या चुलत्यांचा तुमच्यावर राग होईल हें मला ठाऊक आहे. पण आज तुम्ही स्वतंत्र नसलांत तरी थोडयाच दिवसांत मिळवते व्हाल. तोंपर्यंत तुम्हाला जो खर्च लागेल तो मी पुरवीन. मला तरी तुमच्याशिवाय कोण आहे ? "

पण माधवरावांनी साफ सांगितलें, की " तुम्हाला जें सांगायचं तें काकांना सांगा ! त्यांच्या आज्ञेबाहेर मला बिलकुल जातां येत नाही. "

तेव्हा पुढे कोण काय बोलणार ! झाल्या प्रकारानें मालती आता अगदी चिडल्यासारखी झाली. ती म्हणाली, " बाबा, पुरे झालं ! काय समजायचं तें समजलं. आता इतउत्तर कुणाची विनवणी अन् पायधरणी करायची नाही. माझ्या नशिबांत जें असेल तें होईल. "

त्या गोष्टीला आता सहा वर्षें झाली होती पण येवढया अल्प काळांत मालतीमध्ये किती विलक्षण फरक पडला होता ! लग्नापूर्वीची ती अल्लड, हसरी, खेळकर मालती आणि आजची गंभीर प्रौढ मालती एकच हें कोणाला सांगून देखील खरं वाटलें नसतें.

तीन वर्षांपूर्वी तिचे आईवडील इन्फ्ल्युएंझाच्या साथीला बळी पडले; त्यामुळे ती सर्वस्वी निराधार झाली. तिला आता त्या गावांत राहाणेंसुद्धा नकोसें झालें. तिच्या इच्छेप्रमाणे थोडयाच दिवसांत तसा योगहि जुळून आला. मालतीची एक दूरची नातलग बाई एका स्त्रीशिक्षणसंस्थेची मुख्याध्यापिका होती. तिने मालतीला लिहिलें, की " आमच्याइकडे एका शिक्षकिणीची जागा रिकामी आहे; ती तूं पतकरीत असशील तर मी तुझ्याकरिता खटपट करतें. उद्योगांत मन गुतवलंस तर मनाला तितकाच विरंगुळा मिळेल. "

मालतीने ताबडतोब ती गोष्ट कबूल केली व आपल्या लहानग्या सुधेसह ती निघून आली.

नवखें गाव, सर्व माणसेंहि अनोळखी, यामुळे एकपरीने तिला बरेंच वाटलें. इथे तिने सर्वांना आपले पति व्यापारानिमित्त परदेशीं गेले असल्याचें सांगितलें होतें. कोणीं या बाबतींत तिची जास्त चौकशी केलीच तर त्याला सडेतोडपणाने एखादें उत्तर देऊन ती गप्प बसवी. त्यामुळे तिच्या वाटेस फारसें कोणी जात नसे

तिची लहानगी सुधी मात्र कधीकधी तिला विचारी,

" आई, माझे बाबा खूप लांब गावाला गेले आहेत, होय ना ग ? पण ते कधी येणार ? अन् येतांना किशीच्या बाबांसारखे खाऊ अन चित्रं अन् खूपखूप गंमत घेऊन येणार ना ? पण आई, कधी यायचे ग ते ?"

यावर अंतःकरणांतली सगळी खळबळ मोठया प्रयासाने आवरून धरून ती उत्तर देई, " होय बरं बाळ, लौकरच येणार आहेत. ते अन् येतांना तुला खूप गंमतदेखील आणणार आहेत. "

त्या निष्पाप जीवाशी अशा प्रकारें प्रतारणा करतांना तिला अतिशय दुःख होई आणि पतीविषयींचा संताप जास्तच वाढे.

तिच्या पूर्वायुष्याचा इतिहास असा होता. पूर्वस्मृतीच्या या दुःखांत चूर होऊन ती बसली असतांच वसतिगृहाच्या पोऱ्याने तिच्या नांवचें पाकीट आणून दिलें. सध्या तिला कुणाकडूनहि पत्र येण्याचा संभव नव्हता. कोणाचें बरें पत्र असावें, असा विचार करीत ती तें पत्र फोडून बघते तों काय आश्चर्य ? तिच्या पतीचें —माधवरावांचें पत्र होतें तें ? त्यांत त्यांनी लिहिलें होतें —

> " इतके दिवस तुझी कांहीच विचारपूस न करतां आज एकाएकी मी तुला हें पत्र लिहीत आहें हें पाहून तूं रागानं माझं हें पत्र कदाचित् वाचणारदेखील नाहीस. पण असं करूं नको. मीं तुझ्या बाबतींत जरी मोठा अन्याय केला असला तरी त्याबद्दल आता मला पश्चात्ताप होत आहे. तुझ्या आणि

लहानग्या सुधेच्या सहवासाची मला अतिशय तहान लागली आहे. तेव्हा माझ्यावरचा सगळा राग विसरून तूं मला आपला म्हण-शील का ? पत्राचं उत्तर ताबडतोब पाठव, म्हणजे मी समक्ष येऊन भेटेन आणि मग काय तें सर्व ठरवू "

पत्र वाचतांना मालतीचा चेहरा संताप, तिरस्कार इत्यादि विका-रांनी भरून गेला होता

आज इतक्या दिवसांनी माधवरावांना आपल्याविषयी प्रेमाचं इतकं भरतं कां यावं हें तिला समजेना मालतीचा त्याग केल्यानंतर त्याच वर्षी पहिल्या मुहूर्तावर त्यांचा पुन्हा विवाह झाला होता हें तिला ठाऊक होतं मग त्यांना पुन्हा आपली गरज का वाटावी ? हं, असं तर झालं नसेल ? त्यांच्या त्या पत्नीचं कांही बरंवाईट. हो, असंच असावं. म्हणून काय झालं ? आजवर आपली इतकी अवहेलना करून आता जरूर लागताच हे आपल्यावर पति म्हणून हक्क बजावूं पाहातात काय ?

मालतीला विलक्षण चीड आली तिला वाटलं, त्यांनी केलेल्या आपल्या अपमानाचं उट्टं फेडायची छान संधि या वेळी आली आहे ! असं एक खरमरीत पत्र लिहून त्यांची अशी निर्भर्त्सना करावी, की त्यांना चांगली आठवण राहील ! असा विचार मनात आल्याबरोबर तिने लिहिण्याचं साहित्य घेतलं आणि आता आरंभ करणार इतक्यांत तिच्या कानांवर सुधेचे शब्द पडले--

"आई, बघ ग ही मंजुळा--"

मंजुळा ही वसतिगृहांतील मोलकरीण. मालतीला वाटलं, नेहमी-प्रमाणे ती सुधीची कांहीतरी चेष्टा करीत असावी. म्हणून ती जरा पुढे झाली व बघते तर सुधा आपल्या चिमुकल्या हातांनी मंजुळेशी लगट करून तिला ओढीत आहे. मालतीला पाहातांच मंजुळा जराशी वरमल्या-सारखी झाली. सुधा चटकन् आईला येऊन बिलगली आणि म्हणाली,

" आई, माझे बाबा खूप लांब गावाला गेले आहेत, होय ना ग? अन् ते लौकरच येणार आहेत ना आपल्याला न्यायला? तर ही मंजुळा अन् आपल्या सैपाकाच्या काकू मला म्हणतात– ' मुळीच नाही! तुझे बाबा तुला कधीच नेणार नाहीत.' होय ग आई?"

हें बोलतांना तिने मालतीकडे लावलेली नजर इतकी केविलवाणी आणि आशापूर्ण होती, की मालतीला गहिवरून आलें. पट्कन् सुधेला उचलून हृदयाशी धरीत आणि तेथून जाण्याकरिता वळणाऱ्या मंजुळेकडे एक रागाचा कटाक्ष फेंकीत ती म्हणाली,

" होय बरं राजा. तुझे बाबा लौकरच यायचे आहेत हें बघ त्यांचं पत्र आलंय् आताच आपल्याला न्यायला येतों म्हणून."

आईच्या तोंडचे शब्द ऐकतांच सुधीची कळी एकदम खुलली आणि आईला सोडून ती टाळ्या वाजवीत " आत्ता कशी जिरली! आम्ही आता बाबांच्या बरोबर गावाला जाणार!" असं म्हणत उड्या मारीत ती निघून गेली. तिच्या वाटेकडे पाहात पाहात मालती किती वेळ तरी उभी होती! थोड्या वेळाने ती भानावर आली तेव्हा तिच्या ध्यानांत आलें, की मघाशी सुधीच्या त्या केविलवाण्या चर्येकडे पाहून आपण तिला तसें सांगून टाकलें-- पण आता? माधवरावांच्या पत्राचें उत्तर काय लिहायचें? सुधेला आपण सांगितल्याप्रमाणे जर घडलें नाही तर ती गरीब पोर पहिल्याहून अधिक हिरमुसली होईल! मग काय? त्यांना अनुकूल असं उत्तर लिहायचं? आज इतके दिवस त्यांनी दाखविलेली बेपर्वाई आणि मानहानि विसरून पुन्हा त्यांना—छे!

मालतीच्या मानी मनाला तोहि विचार सहन होईना. एकीकडे अभिमान आणि दुसरीकडे अपत्यवात्सल्य अशी तिच्या मनाची सारखी ओढाताण सुरू होती. शेवटीं पुष्कळ वेळाने तिचा एक विचार निश्चित झाला आणि तिने पत्र लिहून संपविलें.

वसतिगृहाच्या दाराशीं टांगा येऊन उभा राहिला आणि त्यांतून एक तरुण देखणा गृहस्थ खाली उतरला. " मला मालतीबाईंना भेटायचं आहे " असं दारावरील भय्याला सांगतांच त्याने आंत जाऊन वर्दी दिली. मालती बाहेर आली उभयतांची दृष्टादृष्ट झाली. बाईंचे यजमान यायचे आहेत अशी गुणगुण वसतिगृहांत सर्वांना लागली असल्याने मालतीच्या खोलीकडे जात असलेल्या त्या उभयतांकडे मुली उत्सुकतेने पाहात होत्या.

" माझ्या त्या पत्नीनं एका मृत अपत्याला जन्म देऊन अंथरूण धरलं. " माधवराव सांगत होते, " आणि सतत दोन वर्ष क्षयासारख्या रोगानं झिजून शेवटी या मृत्युलोकाचा तिनं निरोप घेतला. आमच्या काकांचा त्रासिकपणा आणि तोंडची बडबड हीं वयोमानामुळं वाढतच होती आता मी मिळविता व स्वतंत्र झाल्यामुळं मला त्यांचा हा त्रास सोसेनासा झाला. त्यांची इच्छा माझं एकदा ' शुभ मंगल ' साजरं करण्याची होती; पण मला आतापर्यंतच्या अनुभवानं पुन्हा बोहल्यावर चढावंसं वाटेना. मला अशी टोचणी लागली, की तुझ्या तळमळणाऱ्या जिवाचे मुके शाप मला बाधत आहेत. तुझा त्याग केल्यापासून माझ्या मनाला समाधान असं कधी वाटलं नाही. झाल्या चुकीची दुरुस्ती करावी असं माझ्या मनांत पुष्कळदा येई, पण लज्जेमुळं हातून कृति मात्र घडली नाही. अशा उदासीन अवस्थेंत मी सुमारें दोन वर्ष काढली. मध्यंतरी काकाहि वारले. त्याबरोबर आमचं घरहि मोडल्यासारखं झालं. काकू आपल्या मुलाजवळ त्याच्या नोकरीच्या गावी गेली. इतरहि माणसं चार ठिकाणीं निघून गेली. घरांत मी एकटाच राहिलों. घर मला खायला येऊं लागलं आणि तुझी क्षमा मागून तुझी विनवणी करून तुला घेऊन यावं हा विचार पुनःपुन्हा मनांत येऊं लागला. शेवटीं एक दिवस मनाचा निश्चय केला आणि लिहिलं पत्र. पण तूं त्याचं इतक्या लवकर उत्तर देशील आणि माझ्या हातून घडलेल्या अपराधाचं परिमार्जन करण्याची संधि देशील असं वाटलं

नव्हतं. मालती, माझ्या आजवरच्या वर्तनाचा मला खरोखरच पश्चात्ताप होतो आहे. माझा सारा कठोरपणा विसरून जाऊन तूं मला मनापासून क्षमा केलीस ना ? ”

मालती कांहीएक न बोलतां स्तब्ध बसली होती. संताप, दुःख इत्यादि विकारांमुळे तिला होणाऱ्या यातना तिच्या चेहऱ्यावर स्पष्टपणें दिसत होत्या. डोळे पाण्याने भरून आले होते.

माधवरावांना वाटलें, आजवरच्या दुःखाचें स्मरण होऊन तिला वाईट वाटत असावें. म्हणून ते उठून तिच्याजवळ गेले आणि म्हणाले,

“ मालती, झाल्या गोष्टीचं आता स्मरण करूं नको. मी अगदी शपथपूर्वक सांगतों, की यापुढं तुझं अंतःकरण दुखावेल अशी एकहि गोष्ट माझ्या हातून घडणार नाही. ”

असं म्हणून तिचे डोळे पुसण्याकरिता ते खाली वाकले तोंच मालती एकदम चमकल्यासारखी खुर्चीवरून उठली आणि म्हणाली,

“ हं, थांबा माधवराव ! मला काही गोष्टीचा खुलासा करायचा आहे. ”

तिच्या चेहऱ्यावरील आविर्भाव पाहातांच माधवरावांची उत्सुकता व आनंद कुठल्या कुठे मावळला ! ते ओशाळल्या मुद्रेने परत आपल्या जागेवर येऊन बसले.

“ माधवराव ! ” भावनांचा पहिला कढ ओसरल्यावर मालती आवेशाने बोलू लागली. “ तुम्हाला मी इकडं येण्याबद्दल पत्र लिहिलं त्याचा अर्थ तुम्ही इतके दिवसांनी का होईना पण परत घरी घेऊन जाण्याची इच्छा दर्शविलीत म्हणून मी आनंदानं हुरळून गेलें आहे असा तुम्हीं केला असेल तर ती तुमची चूक आहे.

“ ज्या दिवशी माझ्या बाबांच्या नी माझ्या परोपरीच्या आळवणीनं तुमच्या हृदयाला यत्किंचितहि पाझर फुटला नाही आणि अत्यंत

निर्दयपणानं तुम्हीं माझा अव्हेर केला, त्या दिवशीं तुमचं नी माझं पतिपत्नींचं नातं सुटलं! तुमच्याविषयीची माझी प्रेमभावनाहि त्याच वेळीं जळून खाक झाली! असं असूनहि माझं सारं दुःख, सारा अपमान गिळून मीं तुम्हाला भेटायला बोलावलं याचं कारण माझी लाडकी सुधा! तुमच्या निष्ठुर करणीनं माझ्याबरोबर त्या कोवळ्या जिवाचं मनहि वेळोवेळी दुखावलं आहे! तिच्या बरोबरीच्या इतर मुलींना पितृसुख आहे; त्या आपल्या वडिलांच्या नाना तऱ्हेच्या गोष्टी तिला मोठ्या अभिमानानं सांगतात आणि त्या वेळी माझी सुधा हिरमुसल्या तोंडानं 'आई! माझे बाबा कुठं आहेत?' असं विचारते, तेव्हा माझ्या अंतःकरणांत कशी कालवाकालव होते तें मी कसं सांगू? त्या अजाण जिवाला दुःख होऊं नये म्हणून मी आजवर– 'तुझे बाबा लांब गावाला गेले आहेत' असं सांगून तिची समजूत करीत आलें आणि तिच्या-करिताच केवळ मी आपल्या म्हणण्याला संमति देईन. पण ती एका अटीवर मी आपल्याकडे येईन ती आपण सुधेचे वडील म्हणून, माझे पति म्हणून नव्हे! एक परकी स्त्री या नात्यानं आपण माझ्याशी वागलं पाहिजे! या मर्यादेचं उल्लंघन आपल्या हातून होईल असं मला जर वाटलं तर त्या क्षणी मी आपल्या घरांतून बाहेर पडेन! तेव्हा नीट विचार करा."

मालतीचें बोलणें ऐकत असतांना पश्चात्ताप, अनुकंपा इत्यादि विकारांच्या छटा माधवरावांच्या मुद्रेवर दिसत होत्या. मालतीचा प्रत्येक शब्द जणू जिव्हारी लागल्यासारखा त्यांच्या अंतःकरणाला झोंबे! मालती बोलायची थांबल्यावर सभोवती गंभीर वातावरण पसरल्यासारखें वाटत होतें. इतक्यांत 'आई' अशी सुधेची गोड हाक ऐकूं आली. दोघांचेहि डोळे तिकडे वळतात तोंपर्यंत ती आलीसुद्धा! माधवरावांना पाहून किंचित् चमकल्यासारखी होऊन आईला बिलगली आणि तिच्या कुशींत तोंड लपवीत तिने हळूच विचारलें,

"कोण आलंय् ग आई?"

सुधेच्या त्या प्रश्नामुळे आणि त्या वेळच्या तिच्या चर्येवरील किंचित् भीतीच्या अशा मोहक भावामुळे सावध झाल्यासारखी होऊन मालतीने तिला हृदयाशी धरून कुरवाळल्यासारखें केलें आणि तिच्या गालाचा एक गोड पापा घेऊन जणू कानांत सांगितल्यासारखें पण अंमळ मोठ्यानेच ती म्हणाली,

" तुझे बाबा ! "

आईचे हे शब्द ऐकतांच सुधेने अंमळ कांहीशा चोरटेपणाने हळूच माधवरावांकडे पाहिलें. आपले बाबा या जाणिवेने वाटणारा आनंद आणि समाधान, अनोळखीपणामुळे वाटणारा संकोच, उत्कंठा इत्यादि निरनिराळ्या विकारांचें प्रतिबिंब अगदी स्पष्टपणें त्या चिमुकल्या डोळ्यांत व चेहऱ्यावर दिसत होतें. आणि तिच्याकडे वत्सलतेच्या स्निग्ध दृष्टीने पाहाणारी मालती ! अहाहा ! किती मनोहर होतें तें दृश्य !

माधवरावांना वाटलें, अरेरे ! आपल्या स्वतःच्या मूर्खपणामुळे आपण या केवढ्या आनंदाला आणि समाधानाला मुकलों होतों ! छे ! मना, विचार कसला करतोस ! जीवितांतील हा सौख्याचा ठेवा, या गोड बालिकेच्या सहवासाचें समाधान– त्यापुढे इतर सर्व सुखें तुच्छ आहेत ! मालतीची अट कबूल कर ! तिच्या मनाला दुखवू नको आणि आजवर सुखासाठी तळमळणाऱ्या आपल्या जिवाला शांत कर !

०००

मालतीला आणि सुधेला घेऊन माधवराव घरी आल्याला बरेच दिवस झाले होते. या अवधींत सुधेची अन् त्यांची तर इतकी गट्टी जमली होती, की एखादे वेळीं मालतीने तिला हाक मारली तरीसुद्धा ती जायची नाही. त्या उभयतांचे तें प्रेम पाहून मालतीलाहि अतिशय समाधान वाटे. पण त्याच क्षणीं तिच्या मनांत येई- हाच विचार, हीच सुबुद्धि त्यांना सहा वर्षांपूर्वी झाली असती तर...? कित्येकदा तिला त्यांची कीवहि येई. तिने आपणाला घातलेली अट मोडू नये, तिच्या भावना दुखावल्या जाऊं नयेत, म्हणून ते अतिशय काळजी घेत.

आणि असें वागत असतांना त्यांच्या मनाला पडणारा ताण, करावें लागणारें आत्मसंयमन तिला स्पष्ट दिसे. तिला अलीकडे समजूं लागलें होतें, की आपणां उभयतांमधील हें अंतर कायम ठेवतांना आपणालाहि प्रयास होत आहेत ! माधवरावांची ती करुण दृष्टि, तिच्या जवळपास वावरतांना चोरटेपणाने वागण्याची त्यांची तऱ्हा, यांमुळे तिचें मन विरघळूं लागे. तरीहि तिच्या मानी स्वभावामुळे ती आपला हट्ट सोडण्यास तयार नव्हती.

त्या दिवशी समोरच्या बंगल्यावर कसलातरी समारंभ होता. गाड्यांची व मोटारींची सारखी रहदारी सुरू होती. सुधा आईचा डोळा चुकवून रस्त्यावर आली. त्या बंगल्याच्या फाटकाशी उभारलेली शोभिवंत कमान, चित्रविचित्र पोशाखांच्या स्त्रीपुरुषांची इकडून तिकडे चाललेली ये-जा, ही सगळी मजा पाहाण्यांत तीं दंग झालीं होतीं. इतक्यांत पाठीमागून आवाज झाला–'पों ऽऽपों ऽऽपों–'सुधा दचकून मागे सरकण्याऐवजी मोटरच्या दिशेकडेच वळली.

आता ती मोटारीखाली सापडणार इतक्यांत माधवराव तिथे कसे आले कुणास ठाऊक ! विचार करायला क्षणाचीहि फुरसत नव्हती. त्यांनी जोराने धांवत येऊन तिला पलीकडे जवळजवळ ढकललेंच ! सुधा बचावली, पण माधवराव मात्र मोटारीचा धक्का लागून खाली बेशुद्ध पडले !

आणि ते जेव्हा शुद्धीवर आले तेव्हा त्यांनी काय पाहिलें ? त्यांची मालती त्यांच्या मस्तकावर आपला हात ठेवून बसली होती. तिच्या डोळ्यांतून अश्रु ठिबकत होते.

" मालती. "

" काय हवं ? ही मी इथं आहें आपल्याजवळ !"

" मालती, माझ्या या बेशुद्धावस्थेंत तुला आपला निश्चय..."

" हं, आता असलं कांही बोलायचं नाही बरं का ! झाली इतकी शिक्षा आपल्याला पुरेशी झाली आणि माझाहि अभिमान नाहीसा झाला आहे. आजपासून आपण पुन्हा एक झालों. समजलं ? " शब्दांनी जें बोलून दाखवितां येणार नाही तें उभतांच्या दृष्टींत एक-मेकांना समजून आलें.

" आई, आई, हें बघ..." पेटलेली चंद्रज्योत हातांत घेऊन येणारी सुधा म्हणत होती.

" हें काय ? " माधवराव म्हणाले.

" आज अश्विन वद्य त्रयोदशी. आजपासून दिवाळी सुरू झाली ! "



# सोन्याचा काटा

काल पासून कुमुदिनीच्या चित्ताची कशी चलबिचल उडून गेली होती. रात्री तिला झोपदेखील नीटशी आली नव्हती. आणि सकाळी नित्यकर्मे आटोपून ती नेहमीसारखी आपल्या 'स्टडी रूम'मध्ये त्या दिवशी शिकवायच्या विषयावरील टाचणें करण्यासाठी बसली होती; पण तिचें लक्ष सारखें घड्याळाकडेच होतें. अखेर रोजच्यापेक्षा लवकरच ती उठली आणि आंतील बाजूस मोलकरणीने डबा आणून ठेवला होता त्यांतून चार घास खाऊन तिने कसेंबसें जेवण संपविलें, शाळेंत जाण्यासाठी कपडे बदलले, केसांवरून पुन्हा फणी फिरविली, पॉवडरचा एक हलकासा हातहि तोंडावर मारला आणि आरशासमोर उभी राहून तिने स्वतःला एकवार नीट न्याहाळून पाहिलें. पुन्हा तिला काय वाटलें कुणास ठाऊक, अंगांतील निळा रेशमी ब्लाऊझ काढून टाकून तिने तलम पांढरास्वच्छ झंपर घातला. कानशिलांवरचे

केस हातांनी चोपून बसवल्यासारखें केलें आणि पुस्तकें व वह्या हातांत घेऊन ती जिना उतरली.

शाळेच्या आवारांत पाऊल टाकतांना तिने आपल्या मनगटावरील घड्याळाकडे पाहिलें. रोजच्यापेक्षा पांच मिनिटें आधीच आली होती ती. स्वतःच्या या अधीरतेबद्दल मनांतून तिला हसूं आलें.

अद्याप कोणी मुली येत होत्या, कोणी शाळेपुढील वाळूच्या पटांगणांतून घोळक्याघोळक्यानें फिरत होत्या. शिक्षकांपैकी कोणीकोणी व्हरांड्यांत गप्पा मारीत उभे होते.

त्या सर्वांकडे आपली हसनमुख प्रसन्न दृष्टि फेकीत ती आपल्या ऑफिसमध्ये गेली.

घंटा झाली, वर्ग सुरू होऊन जिकडेतिकडे शांतता पसरली. कुमुदिनी ऑफिसचे कांही कामकाजाचे कागदपत्र वरवर चाळीत बसली होती तरी तिचें लक्ष दरवाजाकडे होतें. कांही वेळानें तिने कंटाळून टेबलाच्या ड्रॉवरमधून एक लखोटा बाहेर काढला आणि त्यांतील कागद बाहेर काढून तो समोर ठेवला.

ती ज्या शाळेची मुख्याध्यापिका होती, त्या शाळेंत एक नवीन शास्त्रीय विषयाचा अध्यापक नेमावयाचा होता. त्यासाठी आलेल्या अर्जांतून व्यवस्थापक-समितीने एकाची निवड केली असून तिला त्याप्रमाणे कळविलेलं होतें.

त्यांतील ' विश्वनाथ नारायण देशमुख, बी. एस्सी. ' या नांवाकडेच ती किती वेळ तरी निश्चल दृष्टीनें पाहात होती.

पाहातां पाहातां तीं अक्षरें पुसट होत जाऊन एक निराळाच चित्रपट तिच्या डोळ्यांपुढून सरकूं लागला.

० ० ०

कॉलेजचें तें रम्य वातावरण! अन् त्यांतून पहिल्या वर्षी नवीनच आलेल्या मुलींना तर तें विशेषच अद्भुत अन् गमतीदार वाटायचें.

त्यातून कुमुदिनी तर रायपूरसारख्या मागासलेल्या गावांतून कॉलेज-शिक्षणासाठी पुण्यास आलेली; तेव्हा ती प्रथम तिथल्या वातावरणांत दिपून तशीच बावरूनहि गेली तर नवल काय !

पहिल्या दिवशी तिने वर्गात प्रवेश केला तेव्हा तर पहिल्यादा सासरीं जाणाऱ्या नववधूसारखी ती लज्जेने अन् संकोचाने अर्धमेली झाली होती. तिचा इतर विद्यार्थिनींच्या मानाने जरासा गबाळा आणि सनातनीच पोषाख व केशरचना पाहून हें कळपांत शिरलेलें अगदीच नवीन अडाणी कोकरू आहे हें ओळखायला पटाईत विद्यार्थ्यांना उशीर थोडाच लागणार ! मग काय विचारतां ! टाळ्या, हशा, कुज-बूज, तिला ऐकूं जावी अशी कुचेष्टा यांना ऊत आला वर्गात. घाबर-लेल्या ससाच्या पिल्लासारखी अंग चोरून अन् मान खाली घालून बसली होती ती. प्राध्यापकाच्या व्याख्यानांतला एकहि शब्द तिच्या कानांत शिरला असेल तर शपथ ! वर्ग सुटला तेव्हा तिला जरा हायसें वाटलें. पण तिचा पुरता छळ करायचेंच आज सर्वांनी ठरविलें होतें. तिला पाठीमागून येतांना पाहून दोघेतिघे वात्रट विद्यार्थी मुद्दामच व्हरांड्यातली चिंचोळी वाट अडवून कांहीतरी बोलत उभे राहिले. तिच्यामागून एकदोन मुली आल्या आणि ते वाटेंतून हालत नाहीतसें पाहून बेदरकारपणें त्यांच्या अंगावरून मुळकांडी मारून निघून गेल्या. एकीनें तर " काही शिष्टाचार कळतो का ? " असें म्हणून जाताजातां तीव्र नजरेने त्याच्याकडे पाहिलें, पण त्यानें शरमण्याऐवजी " अरे बाप रे ! बेट्या, जळून भस्म होशील की ! " असें एकमेकात म्हणत ते मोठ्यानें हसले आणि अधिकच ऐसपैस उभे राहिले

आता काय करावें अशा विचारानें गोंधळून कुमुद तिथे उभी आहे तोंच एक समोरून काळसर पण उंचनिंच पाणीदार चेहऱ्याचा मुलगा आलेला तिने पाहिला कुमुदची गोंधळलेली मुद्रा आणि त्या विद्यार्थ्यांची चाललेली टवाळी त्याच्या लक्षांत आली असावी कारण लगेच " ए ! अशी वाट अडवून काय उभे राहिलांत रे !" असें म्हणत

त्याने एकाला हाताने धरून आणि दुसऱ्याला कोपराने दाबून मागे ढकललें. कुमुद चट्कन् निघून गेली; पण जातांना त्या तरुणाकडे एक कृतज्ञतादर्शक कटाक्ष टाकायला ती विसरली नाही.

या पहिल्याच प्रसंगी विश्वनाथाबद्दल जो आदर कुमुदला वाटला तो पुढे वाढतच गेला.

नंतर पुढे जेव्हाजेव्हा कॉलेजच्या आवारांत अगर कुठेहि आसपास त्यांची गाठ पडे तेव्हा कुमुदचे आदराने भारावलेले डोळे त्याच्या नजरेला भिडत व नकळतच तिच्या मुखावर स्मित उमटे. तो तरुणहि—विश्वनाथ—त्याला तशाच स्मिताने उत्तर देई.

या मूक परिचयाला एके दिवशी विश्वनाथानेच तोंड फोडलें.

"आपण इतके दिवस एकमेकांना पाहातों आहोत..." कॉलेजच्या फाटकाजवळ तिची गाठ पडतांच त्याने पुढे होऊन म्हटलें, "पण एकमेकांचीं नांवंदेखील माहीत नाहीत आपल्याला. तेव्हा मी आधी तुम्हांला माझी ओळख करून देतों. माझं नांव विश्वनाथ नारायण देशमुख..." अशी सुरवात करून त्याने तिला जी माहिती सांगितली त्यावरून कुमुदला कळून आलें, की खानदेशांतल्या एका प्रसिद्ध व संपन्न वकिलाचा तो मुलगा आहे. यंदाचं वर्ष त्याचं शेवटचंच होतं.

कुमुदनेहि आपली हकीकत त्याला सांगितली. कशीबशी मीठभाकरी खाऊन कुटुंबाची गुजराण करणारे कारकुनी पेशाचे तिचे वडील तिच्यासकट चार भावंडांना आणि तिच्या आईला अनाथ करून परलोकीं निघून गेले होते. कुमुद त्या वेळी नुकतीच इंग्रजी पांचवींत गेली होती. वडिलांची हौस आणि कुमुदची हुषारी यांमुळेच आतापर्यंत निभावलेलें कुमुदचें शिक्षण यापुढे खरं म्हटलें तर बंदच पडायचें; पण तिच्या आईने जोर धरला. कुमुदला खटपटीने नादारी मिळाली अन् प्रवेशपरीक्षा उत्तीर्ण होऊन ती आता कॉलेज-शिक्षणासाठी इथे आली होती. वसतिगृहांत राहाणें झेपण्यासारखं नसल्यामुळे तिची

एक दूरची मावशी इथे मराठी शाळेंत शिक्षिका होती तिच्या खोलींतच कुमुद राहात असे. तिच्या माहितीने तिने दोन लहानशा शिकवण्याहि मिळविल्या होत्या. असाच मेहनतीने अन् काटकसरीने शेवट गाठायचा तिचा बेत होता.

कुमुदच्या स्वावलंबी वृत्तीचें विश्वनाथाला मोठें कौतुक वाटलें. तिच्या अतिशय साध्या—इतर विद्यार्थ्यांच्या भाषेंत सांगायचें म्हणजे आळणी -- वागणुकीचें कारण त्याला आता उमगलें. पण साध्या टिकेकरी पातळांत आणि रंगभूषेविना चेहेऱ्यांतच ती त्याला अधिक सुंदर दिसूं लागली.

हळूहळू त्यांची मैत्री वाढत गेली. कॉलेजच्या वातावरणांत अशा मैत्रीवर जीं भाष्यें अन् चेष्टा होते त्याचा मारा त्यांच्यावरहि झाला. तीं दोघें हसण्यावारी नेत; पण मनांतून त्यांना या थट्टेने आनंदच होत असल्याचें दिसून येई. परिक्षेच्या आधी दोघेजण एके दिवशीं बोलत असतांना कुमुद म्हणाली,

"परीक्षा झाल्यावर लगेच गावीं जाणार असाल तुम्ही ? अन् ही परीक्षा संपली की दुसरी वाटच पाहात असेल तुमची ?"

"ती कसली ?" विश्वनाथाने सहजपणाने विचारलें.

"वधूपरीक्षा !"

तिच्या तोंडचे ते शब्द आणि ते विचारण्याच्या पाठीमागील लबाडी समजून विश्वनाथ हसला आणि गंभीरपणाने म्हणाला,

"ती परीक्षा आधीच केली आहे मीं."

"अगबाई ! खरंच ? कळू द्या तरी कोण पास झालंय् तें ?"

"वा ! निकाल असा आधी फोडतात वाटतं ! जाहीर झाला म्हणजे कळेल आपोआप."

या आणि अशा प्रकारच्या संभाषणाने एकमेकांचीं अंतःकरणें उभयतांनी ओळखलीं होती.

गावी जायच्या आदल्या दिवशी तर विश्वनाथाने आपलें अंतःकरण स्पष्टपणें उघड करून कुमुदला सांगितलें होतें, की, गेल्याबरोबर तात्यांना कळवून त्यांची संमति मिळाल्याचें तुला लगेच पत्र घालतों.

कुमुदला वाटलें, जगांत जिकडेतिकडे आनंदाशिवाय दुसरें कांहीच नाही.

पण माणसाच्या साऱ्याच अपेक्षा पूर्ण होत्या तर आणखी काय हवें होतें ?

दर दिवशी टपालाची चातकासारखी मार्गप्रतीक्षा करणाऱ्या कुमुदच्या हाती पंधरा दिवसांनी अपेक्षित हस्ताक्षराचें पत्र आलें.

लहान मुलाच्या अधीरतेने तिने तें फोडलें.

पण त्यांत... ..

आशेच्या पंखावरून बसून अंतराळांत विहार करणाऱ्या तिच्या मनाला खाली आणून सत्य सृष्टींतल्या खड्ड्यांत ढकलून देणारा मजकूर होता.

विश्वनाथानें लिहिलें होतें– " आपल्यासारख्या प्रतिष्ठित सुखवस्तु गृहस्थाच्या मुलाचें लग्न एका गरीब अन् शिवाय जिच्यामागे अनाथ भावंडांचा अन् आईचा व्याप आहे अशा मुलीशी होणें त्याच्या वडिलांना मुळीच पसंत नाही. इथे कितीतरी हुंड्याच्या मुली सांगून येताहेत. त्यांतली वाटेल ती पसंत करावी असें त्यांचें म्हणणें. मी माझें म्हणणें पटवून देण्याचा प्रयत्न करतोंय; पण ते त्राग्याने ऐकून घ्यायलाहि तयार नाहीत. आईचेंहि अर्थात् त्यांच्याचसारखें मत आहे. तात्यांच्या या अरेरावीनें मी अगदी हताश होऊन गेलोंय्..." इत्यादि.

विश्वनाथाच्या या पत्रानें कुमुदच्या सुखस्वप्नांचा चक्काचूर होऊन गेला! तरी वेड्या आशेने ती त्याच्या पुढील पत्राची वाट



"होय, त्यासाठीच आलों आहे मी."

पाहात होती. पण महिना लोटला .. सहा महिने लोटले अन् वर्षेहि निघून गेली.

आज सहा वर्षांनी तें परिचित नांव तिच्या दृष्टीसमोर आलें होतें अन् थोड्याच वेळांत विश्वनाथ– हा येणारा माणूस– म्हणजे आपला पूर्वपरिचित विश्वनाथच याबद्दल तिला शंका नव्हती. तो तिला समक्षच भेटणार होता.

विचारतंद्रीतून भानावर येतांच तिच्या मनाचा गोंधळ उडाला. तो भेटेल तव्हा पहिली ओळख दाखवील की नाही ? आपण त्याच्याशीं पूर्वीच्या मोकळेपणाने बोलावं की आजच्या आपल्या अध्यापिकेच्या रुबाबांत ? त्याचें लग्न . हा विचार मनांत येताच क्षणभरच कुमुदच्या अंतःकरणांत एखादी सुई टोचल्यासारखें झालें... झालें असेलच बहुतेक, मग मुलें, बायको घेऊनच येईल तो।

तवढ्यांत दार वाजलं अन् कुमुदिनी वर डोळे करते तों दुसऱ्या दोन डोळ्यांशी तिची नजरानजर झाली

एक क्षण-- विश्वनाथाच्या चेहऱ्यावर आश्चर्य, आनंद इत्यादि विकार उमटून गेले पण दुसऱ्याच क्षणी गंभीर मुद्रेने त्याने तिला नमस्कार केला आणि कांही न बोलता खिशातून नोकरीवर हजर होण्याचा हुकूम काढून तिच्यापुढे टेवला।

कुमुदची तर अतिशय त्रेधा उडून गेली होती त्याची गंभीर व आदबीची वागणूक पाहून सलगीच्या नांवाने संबोधावें अगर बोलावें असा तिला धीर होईना त्याने दिलेल्या कागदावर नजर टाकीत ती खालच्या मानेने म्हणाली,

" बसा ना. "

पलीकडच्या एका खुर्चीवर तो बसला आणि खिशांतील रुमाल काढून कपाळावरचा घाम टिपूं लागला.

हातांतल्या त्या कागदावर नजर फिरविण्यांत कुमुदने उगीचच तीनचार मिनिटें घालविली आणि तेवढ्यांत मन स्थिर करून त्याच्याकडे पाहात विचारलें, " आजच आलांत ना इथं ? "

" हो साडेदहाच्या गाडीनं आलों. खाणावळींत आंघोळ, जेवण, कपडे करीपर्यंत जरा उशीर झाला. " त्यानें आदबीनें उत्तर दिलें

" ठीक आहे सर्व ? "

हा घरोब्याचा प्रश्न विचारल्यामुळें त्याच्या वागणुकीतला त्रयस्थपणा नाहींसा होईल अशी कुमुदिनीची कल्पना होती.

पण तो पूर्वीच्याच गंभीरतेनें म्हणाला–

" हो. "

मग कुमुदला काय वाटलें कोण जाणे, तिनें आपली दृष्टि चालू कामाकडे वळविली. त्याच्या कामकाजासंबंधी जरूर ती माहिती व सूचना देऊन तिनें घंटा वाजवून शिपायाला आंत बोलावलें आणि सांगितलें, " यांना पांचवी ' ब ' क्लास दाखव "

विश्वनाथाला कामावर हजर होऊन महिना झाला होता. या अवधींत कामापलीकडे तो कधी एकहि शब्द बोलला नव्हता. कुमुदला त्याची हकीकत जाणून घेण्याची उत्सुकता असूनहि त्याच्या अशा तुटक वागण्यानें तिला बोलण्याचा धीर होत नव्हता.

पण एके दिवशी मात्र तिला अगदी राहावेनाच ! विश्वनाथ तिच्या टेबलाजवळ कांही टिपणें दाखवावयास आला असतांना त्यानें पुढे केलेले ते कागद हातानें बाजूला सारीत ती म्हणाली, "विश्वनाथ–"

विश्वनाथनें चमकून तिच्याकडे पाहिलें.

" खाली बसा, तुमच्याशी बोलायचं आहे कांही ! "

तो मुकाट्यानें अधोवदन खाली बसल्यावर ती पुढे म्हणाली, " विश्वनाथ ! सहा वर्षांमागं आपली जिव्हाळ्याची ओळख होती

आपण कितीतरी बेत अन् मनोराज्यं रचली होती तेव्हा. ती आज धुळीला मिळाली असलीं तरी पूर्वीच्या आपलेपणाची ओळखदेखील देऊं नये इतकी तुम्हाला ती क्लेशकारक वाटते का ? ”

क्षणएक स्तब्ध राहून विश्वनाथानें कुमुदच्या नजरेला नजर लावली आणि तो मंद स्वरांत बोलू लागला.

“ कुमुद...अ. अ कुमुदताई, मी नोकरीसाठी इथं आलों, तेव्हा तूं.. तुम्ही इथं अशा आकस्मिक भेटाल हें माझ्या स्वप्नीहि नव्हतं. सहा वर्षांपूर्वी आपली ओळख होती, तेव्हाची आणि आत्ताची परिस्थिति यांत किती अंतर ! स्वतःच्या परिश्रमानं आणि सुदैवानं तूं आज हें जबाबदारीचं अन् मानाचं स्थान निश्चित मिळविलं आहेस. अन् मी ! त्या वेळी भावी आयुष्यासंबंधी केलेले बेत मनांतच विरले. एकाहि बाबतीत प्रतिकूल परिस्थितीवर मी विजय मिळवू शकलों नाही. कालपरवापर्यंत बेकाराच्या यादीत जमा होतों. आज इथं तात्पुरती कशीबशी जागा धरून आहे. मग कोणत्या तोंडानं पूर्वीच्या आपलेपणाची ओळख देऊं ? ”

अंतःकरणापासून बोलत होता तो. निराशा, खेद, मानहानि इत्यादि अनेक भावनांनी त्याचा आवाज कातर झाला होता. तासाची वेळ झाल्यामुळे कुमुदने त्याचें थोडक्याच शब्दांत समाधान केलें आणि संध्याकाळी शाळा सुटल्यावर ती त्याला आपल्या बिऱ्हाडी घेऊन गेली.

नेहमी गंभीर आणि सर्वांशी जितक्यास तितकें वागणाऱ्या बाई आज नव्या मास्तरांना बरोबर घेऊन निघालेल्या पाहून सर्वच शिक्षकांच्या मुखांवर आश्चर्य उमटलें आणि त्यांच्या कल्पनाशक्तीला एक चांगलेंच खाद्य मिळालें.

कुमुदसारख्या दरिद्री मुलीला नाकारून मोठ्या हुंड्यानिशी एखादी लक्ष्मीकन्या सून करून घेण्याचें मनोराज्य करणाऱ्या विश्वनाथाच्या तात्यांना मोटार-अपघाताच्या रूपाने देवाघरचें बोलावणें

आलें. वडिलांच्या मोठेपणाचें छत्र अन् वशिला दूर झाल्यावर बायको आणि नोकरी या दोन्ही बाबतीत विश्वनाथाची किंमत एकदम उतरली. लहान भावंडांचं शिक्षण, बहिणीची लग्नं वगैरे जबाबदाऱ्या पार पाडीत आणि बेकारीशी झुजत तो शेवटी हंगामी शिक्षक म्हणून तिथे आला होता. ही सारी हकीकत त्याच्याकडून समजली तरी कुमुदला हवा तो मुख्य खुलासा त्यानें केलाच नव्हता !

म्हणून तिनेच शेवटी विचारलें, "तुमचं स्वतःचं लग्न .. मुलंबाळं..."

"हूं ! तात्या वारल्यामुळं तो प्रश्न आपोआप लांबणीवर पडला. नंतर आईनं तगादा लावला होता; पण मी तिला एकदा सांगून टाकलं, तूं ही गोष्ट पुन्हा काढू नकोस म्हणून .."

दोघांच्याहि तोंडून एकदमच दीर्घ सुस्कारे बाहेर पडले. विश्वनाथाचा अर्थात् औदासिन्यदर्शक होता; कुमुदचा मात्र सहानुभूतिदर्शक होता की इष्ट ती गोष्ट समजल्याबद्दल समाधानाचा होता हें तिचें तिलाच ठाऊक !

कुमुदला वाटलें, इतक्या दिवसांनी पुन्हा आणखी अशी गाठ पडण्यांत दैवाचा खास कांहीतरी हेतु आहे. मधली सहा वर्षें गेलीच नाहीत असें समजलें तर ?

दिवसामागून दिवस जात होते. विश्वनाथाच्या मनाचा उदासपणा बराच कमी झाला. शाळा सुटल्यानंतर कुमुद त्याला आग्रहाने बहुधा आपल्या बरोबर घरीं नेई. तेथून चहा घेऊन दोघें बाहेर फिरायला जात अगर घरींच गप्पा मारीत.

तिचा वठून गेलेला आशावृक्ष पुन्हा पल्लवित होत होता.

त्या दिवशीं रविवार होता. चहाची तयारी करून अधीर चित्ताने कुमुद विश्वनाथाची वाट पाहात होती.

सकाळी न्हाऊन वाळविलेल्या लांबसडक केसांचा सैलसर आंबाडा घालून त्यावर मोगऱ्याची एकच सपर्ण कळी जराशी उजव्या बाजूकडे तिने खोचलेली होती; नेसलेला पारवा सोनसळी रास्ता व हिरवट रेशमी ब्लाऊझ तिच्या तांबूस गोरवर्णाला शोभून दिसत होता

जिन्यावर पावलें वाजतांच तिने उत्सुकतेने दार उघडलें

पण हें काय ? विश्वनाथाचा चेहरा असा उतरलेला कां ?

"माझं पत्र मिळालं ?" तिने दबकत विचारलें

"होय. त्यासाठीच आलों आहें मी "

म्हणजे आपण दोघांनी आता विवाह करावा ही कल्पना विश्वनाथाला मान्य नाही ? कां बरं ? आपल्यावरील प्रेमाकरिता तो अद्याप अविवाहित राहिला. परिस्थितीने एक वेळ उधळून दिलेला डाव पुन्हा जमविण्याची संधि आली असतांना आडकाठी कोणाची ? कुमुदला कांही समजेना ! ती वेड्यासारखी त्याच्याकडे पाहूं लागली.

विश्वनाथ म्हणाला, "कुमुद, ज्या वेळी तुला प्रथम इथं पाहिलं तेव्हा मलाहि क्षणभर आनंद झाला आणि मागचे दिवस पुन्हा आठवू लागले. पण व्यवहारांत त्याचा उपयोग काय ? मी तुझ्यावर प्रथम प्रेम केलं तेव्हा असा हीनदीन दरिद्री नव्हतों. भावी आयुष्यांत अनेक पराक्रम करून विजय मिळविण्याची महत्त्वाकाक्षा बाळगणारा एक नवजवान होतों. तुझं अंत:करण जिंकून तुझी प्राप्ति करून घेणं हाहि तेव्हा एक विजयाचाच खेळ होता.

"पण आता तूं गरिबीतून वर आलीस. आज महिना दीडशे रुपये मिळवितेस. दैवानं सतत हात दिल्यानं तुझ्या मनाची उमेद कायम आहे. मी चाळीस रुपयांवर रखडतों आहें. तुझी प्रीति हा लौकिक भेद मानीत नाही हें मी समजतों. म्हणून तर तूं स्वत: होऊन विवाहाची इच्छा दर्शविलीस. पण माझं मन आत्तापर्यंतच्या अनुभवानं

मेलं आहे. कसलीहि उमेद अगर आशा मला उरली नाही. अशा स्थितींत तुझं प्रेम मला दुबळ्याला देऊं केलेल्या भिक्षेसारखं वाटतं. तें स्वीकारण्याचा उल्हास माझ्यांत नाही. व अशा स्थितीत माझ्याशीं विवाह करून तुला तरी काय सुख होणार ? जग पैशानंच माणसाची किंमत करतं. हा सोन्याचा काटाच तुझ्यामाझ्या विवाहाला तेव्हाहि नडला व आताहि नडतोय् ! लोक तुला हाताखालच्या एका दरिद्री मास्तरशीं लग्न केल्याबद्दल नांवं ठेवतील. तुझ्यासारख्या कर्तबगार बायकोचा नादान दरिद्री नवरा म्हणून माझी टवाळी करतील ! तुला तरी ही मानहानि सोसेल का ? कुमुद, क्षमा कर मला. पण तूं देऊं केलेल्या बहुमोल प्रीतीचा खरा सन्मान मी त्याचा स्वीकार न केल्यानंच होणार आहे. जातों मी. यापुढं पूर्वीचा विश्वनाथ विसरून जा ”

विश्वनाथ जिना उतरून गेला तरी कुमुद शून्य दृष्टीने त्याच्या वाटेकडे पाहात तशीच किती वेळ बसली होती !



# कोंडमारा

संध्याकाळीं ऑफिसमधून बाहेर पडतांना मोठ्या खुशींत होतों मी. काम करतांना काढून ठेवलेला समोरचा कोट मी एकवार झटकून अंगांत घातला. गळ्याभोवती हात फिरवून शर्टची कॉलर साफसूफ केल्यासारखें केलें. कोटाच्या आंतल्या खिशांत हाताने चाचपून अन् नजरेने डोकावून सर्व बरोबर असल्याची खात्री करून घेतली. त्या आठवड्यांत चालू असलेल्या अन् पोरबाळांच्या तोंडीं झालेल्या एका बोलपटांतील एका गाण्याची ओळ मनाशीं गुणगुणत जिना उतरलों.

यावरून मला कसला तरी अपूर्व अन् आकस्मिक लाभ झालेला असावा, लॉटरींत एखादें बक्षीस मिळालें असावें, असा तर्क करतील कुणी!

पण तसें कांहीएक नव्हतें. ती महिन्याची पहिली तारीख होती. तीस दिवस मान मोडेपर्यंत केलेल्या श्रमाची मजुरी मिळायचा दिवस होता तो.

हा दिवस म्हणजे कारकून लोकांची पर्वणीच म्हणाना! या दिवसावर किती जणांची नजर लागून राहिलेली असते!

सौभाग्यवतीच्या छापील पातळापासून तों यमीच्या नव्या पाटीच्या अन् बाबूच्या रबरी फुग्याच्या हट्टापर्यंत सारे तगादे या तारखे-पर्यंत थोपवून धरलेले असतात.

हातांत पडलेल्या या चाळीसपन्नास रुपयांतून या मागण्या अन् कापडवाला, दूधवाला इत्यादि वाल्यांची बिलं पोचवायची हमाली केली की खिसा मोकळा! दुसऱ्या दिवसापासून पुन्हा नेहमीच्या अडचणी अन् विवंचना यांनी जीव गारठायचा आहे हें ठाऊक असलें तरी त्या दिवशीं ही ऊब मोठी मजेदार वाटते अन् मनाला विशेष उत्साह वाटतो एवढें मात्र खरें.

आमच्या ऑफिसमधले वक्रतुंडपंत रडतोंडेदेखील समोरच्या उप-हारगृहांतल्या पोऱ्याला स्पेशल चहाची ऑर्डर दिल्यावांचून राहात नाहीत त्या दिवशी!

रस्त्यात ' दादा, गरिबाची दया '' म्हणत भीक मागणारालाहि एखादी दिडकी मिळायचा दिवस हाच!

तव्हा पगाराचे साठ रुपये माझ्या खिशात खुळखुळत होते हें तर माझ्या आनंदाचें एक कारण होतेंच, पण दुसरें असें, की दुसऱ्या दिवशी रविवार होता. लौकर उठायचा तगादा नव्हता मला आवडणाऱ्या एका नटीचें काम असलेला एक सुंदर चित्रपट पाहायला जायचा बेत मी ठरवला होता. अन् सर्वांत महत्वाचें कारण म्हणजे गेले पंधरा दिवस माहेरी गेलेल्या आमच्या राणीसाहेब आज सकाळीच परत आल्या होत्या.

आपल्या नादांतच मी रस्त्यावर आलों.

" काय हो, येणार का ? " उपहारगृहाच्या दाराशीं उभें राहून विचारणाऱ्या बंडोपंतांचे शब्द मला ऐकूंच आले नाहीत.

घरीं जाऊन कुंदेच्या हातचा झकासपैकी चहा घ्यायचा अन् दोघांनी मिळून सिनेमाला जायचें हा बेत घोळत होता माझ्या मनांत.

जातांना वाटेंत दोन आण्यांची मोगऱ्याची वेणीदेखील विकत घेतली मी.

पुढचें दार लोटून मी आंत गेलों तेव्हा कुंदा चहाच्या तयारींतच होती. स्टोव्हवर आधण उकळत होतें अन् किटलीत चहासाखर घालीत होत्या बाईसाहेब.

हलक्या पावलांनी आंत जाऊन डोळे झाकले मी तिचे.

" ओळखलं ! सुधाताई ! " असें म्हणत तिने माझे हात चाचपून पाहिले अन् म्हणाली, " इश्श ! हें काय ? सोडावे ना डोळे ! "

" ओळख म्हणजे सोडतों. "

" आता काय ओळखायचं आणीक ! "

" मग नांव सांग की कोण तें ! "

" हें काय असलं ! आधण उकळून चाललंय् बरं का. सोडावेत ना लवकर ! "

पण तिच्या या आर्जवाला मी थोडाच दाद देणार होतों ?

लाजत, मुरकत, हळू आवाजांत ' अशोक ' येवढें म्हणायला किती आढेवेढे अन् वेळ घेतला तिने ! आणि मी हात काढतांच डोळे मोठाले करून रागावल्याचें काय पण नाटक केलेंन् !

मीं म्हटलें, " अहाहा ! काय पण आव आणला आहे रागवायचा ! पण नुसत्या डोळ्यांना धाक लावला न हसण्यासाठी तरी ओठ अन् गाल फितुरी करताहेत की... "

येवढं म्हणेपर्यंतच ओठांच्या नाजूक पर्णकोषांतून कुंदकळ्या बाहेर डोकावल्या अन् बघतां बघतां फुलेंहि झालीं त्यांची !

आणि मग त्याचा सुवास घेण्याची इच्छा मला आवरणार थोडीच ?

" हं, आटप लौकर, उशीर होतो आहे "

लांबसडक केसांच्या पिळावर हळूच एकेक आकडा बसवीत असलेल्या कुंदेला मीं म्हटलें.

किती सुंदर आहेत कुंदाचे केस ! भुंग्यासारखे काळे अन् रेशमासारखे मऊ अन् चकचकीत. मोठया ऐटबाज तऱ्हेने कानांवरून वळवून घेऊन गुंडाळलेला त्यांचा पीळ किती शोभून दिसत होता तिच्या गोऱ्यापान मानेवर !

" चलायचं ? " सारा थाटमाट मनासारखा झाल्यावर माझ्याकडे वळून कुंदाने विचारलें.

तिचे दोन्ही हात आपल्या हातांत धरून मी अनिमिष नजरेने तिच्याकडे क्षणभर पाहात राहिलों.

पण एकाएकीं तिच्या नजरेंतला ओसंडता आनंद मावळल्यासारखा झाला. चट्कन् माझ्या हातांतून आपले हात सोडवून घेत ती हळूच म्हणाली

" समोर बघावं. "

मीं पाहिलें तर खरंच ! समोरच्या बिऱ्हाडाच्या खिडकीत कालिंदी उभी होती. भुकेल्या प्राण्याची तीव्र क्षुधा होती तिच्या नजरेंत. कसेंसेंच झालें मला तिच्याकडे पाहून. आमची नजर तिच्याकडे गेल्याचें तिच्या लक्षांत येतांच तिने गडबडीने खिडकी लावून घेतली.

दुसऱ्या दिवशीं रविवार. जेवण करून आरामशीर पडलों होतों वाचीत. मधूनमधून वाचलेल्या मजकुरावर कांहीतरी गमतीची टीका अन् हास्यविनोदहि चालू होता आमचा.

दारावर कुणींतरी ‘ टक् टक् ’ केलें.

“ कोण आहे ? ” विश्रांतीत अन् गप्पांत व्यत्यय आल्यामुळे जरासें त्रासूनच कुंदेने विचारलें.

“ मी... कालिंदी. ”

कुंदेच्या कपाळावर अधिकच आठया चढल्या. सहेतुकच तिने माझ्याकडे पाहिलें.

“ उघड दार. कांही झालं तरी शिष्टाचार पाळलाच पाहिजे ना. ” मी म्हटलें.

“ काय हवं आहे ? ” दारांतूनच ती ब्याद परतवतां आली तर बरें असें वाटून कुंदेने तिला दार उघडतांक्षणींच विचारलें.

“ कांही नाही. करमेना अगदी म्हणून आलें. म्हटलं, तुमच्या-कडे कांही वाचायला मिळालं तर पाहावं. ” असें म्हणत कालिंदी आंत शिरलीदेखील.

“ छे हो ! आमच्याइथं कांही नाही वाचायसारखं. ” तुटकपणाने कुंदेने उत्तर दिलें.

“ अशोकदादांच्या हातांत दिसतंय् की कायसं... ”

आता मात्र मला अतिशय राग आला तिचा !

“ तं वाचायचं आहे मला अजून. अन् आम्ही लोकांच्यासाठी नाही आणीत पुस्तकं वाचायला ! ” असें म्हणून इतक्या उपरोध आणि तिरस्कारपूर्ण नजरेने पाहिलें मी तिच्याकडे, की तिनें घायाळ होऊन मानच खाली घातली.

“ जातं तर मग. ” येवढें कसेंबसें म्हणून झटकन् ती बाहेर पडली. तिची त्या वेळची गोरीमोरी चर्या अन् पाण्याने भरलेले डोळे पाहून मलाहि जरा वाईट वाटलें. पण तें क्षणभरच !

कालिंदीशी असं तुटक अन् कठोर वर्तन करायला कारणच होतं आम्हांला तसं.

आम्ही या वाड्यांत राहायला आल्याबरोबर पहिली ओळख कालिंदीच्या घरच्या मंडळीशींच झाली आमची. आम्ही सामानसुमान गाडींतून उतरून घेतों आहों इतक्यांतच कालिंदीचे वडील बिऱ्हाडाच्या दारांत येऊन चौकशी करूं लागले—

" नवीनच थाटलाय वाटतं संसार ? "

" होय. "

" नोकरी आहे इथं का कांही व्यापारधंदा ? "

" नोकरीच आहे. "

" अस्सं. नांव काय आपलं ? "

" अशोक पद्मनाभ देशमुख. आपणहि इथंच राहातां वाटतं ? " आपणहि कांहीतरी विचारावें म्हणून मी म्हटलें.

" हो, हा तुमच्या पलीकडच्या बाजूला. नारायण वासुदेव भावे माझं नांव. मी म्युनिसिपालिटीत आहे नोकरीला. सातआठ माणसांचं कुटुंब आहे. मुलगाहि एक नुकताच लागला आहे पोस्टांत. बरं झालं, शेजार चांगला आला आम्हाला. आता बायकामंडळीची ओळख होईलच म्हणा. घरांत कांही लागलं सवरलं तर मागून घेत चला. "

अशी सुरवात झाली अन् पुढे नानांच्या घराशी वाढत गेला आमचा घरोबा. त्यांतल्या त्यांत कालिंदी तर वरचेवर आमच्याकडे यायची.

एक दिवस कुंदा मला म्हणाली,

" किती लघळ आहे हो ही कालिंदी ! मला बाई रागच यायला लागला आहे तिचा. "

" काय केलं ग तिनं बिचारीनं ?"

" बरी होईल बिचारी ! तुम्ही घरांत असल्याची वेळ बघून येते नेहमी. तिच्यादेखत मोकळेपणानं वागायची देखील चोरी ! अन् पाहाते कशी विलक्षण नजरेनं बघितलं नाहीत ! पाहवत नाही मेलीला दुसऱ्याचं सुख ! मी बघीन बघीन अन् सांगेन एखाद दिवशी .."

कुंदा म्हणाली तें कांही खोटें नव्हतें. वागत असे खरीच कालिंदी अशी विचित्र ! कित्येकदा तर आम्ही दोघें कसल्यातरी चेष्टा-मस्करीच्या ऐन रंगांत असतांना यायची ती अन् अशी हळू अन् दबत दबत ! तिची अस्थिर वृत्ति अन् नजरेंतली चंचलता कशीशीच वाटायची !

अन् कुंदेला तिचा जास्त राग यायचें कारण म्हणजे माझ्याशी अधिक सलगी करण्याचा तिचा प्रयत्न.

पण कालिंदीच्या या विचित्र वागणुकीचें कारण जाणण्याइतका विचारी होतों मी.

दुर्दैवी जीव ! अंाट घटकेचं सौभाग्य भोगलें नाही तोंच वयाच्या सोळाव्या वर्षीं वैधव्य आलें होतें तिच्या कपाळी. कळी पुरती उमलली नाही तोंवरच निर्माल्य झालें होतें तिचें पांचसहा वर्षें झालीं होतीं त्याला. आज ऐन तारुण्यांतल्या उसळत्या भावनांचा कोंडमारा करतांना पतीच्या मृत्युसमयी त्या कोवळ्या वयात पेटली नसेल इतकी आग भडकत होती तिच्या अंतःकरणांत. इतर माणसांचा आनंद पाहून त्या सुखाला वंचित झालेलें तिचें बुभुक्षित अंतःकरण लोभाने लालसावलें, हेव्याने, मत्सराने तडफडलें तर नवल काय ?

माझ्या मनांतले हे विचार सांगून मी कुंदाला म्हटलें,

" तूंच सांग आता, कालिंदीवर रागावण्याऐवजी आपण तिची कीवच केली पाहिजे की नाही ? तिची मनःस्थिति फार नाजुक आहे या वेळची. संयमाच्या कड्याच्या अगदी टोकावर उभं राहून तोल साव-

रायचं काम किती बिकट याची असल्या अभागी स्त्रियांवांचून इतरांना काय कल्पना ! एखाद्या क्षणाच्या गैरसावधपणानं अधःपाताच्या दरीत कोसळायची पाळी ! म्हणून म्हणतों, तिच्यावर रागावण्याऐवजी तिच्या-साठी कांही करतां येईल का तें पाहूं या आपण. तूं जर मनावर घेशील तर जुळेल सारं."

माझ्या या बोलण्याने कुंदेचा पहिला राग ओसरून ती गंभीर झाली होती. मंद स्वरांत ती म्हणाली,

"गरीब बिचारी ! खरंच कसला दोष द्यायचा तिला ? बरं, पण काय करतां येईल तिच्यासाठी आपल्याला ?"

"तिचं लग्न होऊन तीहि आपल्यासारखी सुखी होईल असा प्रयत्न करायचा."

"आपण ? तो कसा बाई ? तिचं घर तर जुन्या वळणाचं. अन् शिवाय तिच्याच मनांत नसलं तर ?"

"ए, असं शक्यच नाही ! इतरांच्यासारखं आपण संसारसुख अनुभवावं असं तिला वाटणारच. कुणीतरी या कामीं पुढाकार घेऊन तिला धीर दिला पाहिजे. तेवढं काम करायचं आपण."

"पण नानांना कसं आवडेल हें ?"

"त्यांची सुद्धा समजूत घालीन मी. आधी तिला मात्र विचा-रून तिचं मन तयार करायला हवं. बाकी तें मोठंसं कठीण नाही म्हणा. इतक्या कळकळीनं आपण तिला मदत करायला तयार आहों असं कळल्यावर ती आनंदानं तयार होईल."

"नको बाई पण ! उगीच नसता वाईटपणा यायचा एखादा !"

"वाईटपणा कसला त्यांत ? तिच्या मनांतून नको असलं तर आम्ही कांही जुलूम का करणार आहोंत ? कसलीहि सुधारणा लौकर घडून येत नाही ती आपल्या लोकांच्या असल्या वृत्तीमुळंच. तोंडानं

गप्पा मारायच्या सुधारणेच्या; पण प्रत्यक्ष कृति करायची किंवा त्याला हातभार लावायची वेळ आली की 'नक्कोबाई' म्हणायचं!" असें म्हणतांना मीं कुंदेची नक्कल केली.

पण कुंदा नेहमीप्रमाणे चिडली नाही. उलट गंभीर होऊन माझ्या बेताला तिने संमति दिली.

एखाद्या सत्कृत्याचा निश्चय केल्याचा आनंद झाला होता मला त्या वेळीं.

बिचारी कालिंदी! किती धन्यवाद देईल आम्हांला!

यानंतर कालिंदीशीं आम्ही अधिक प्रेमाने आणि आपलेपणाने वागू लागलों.

आणि एके दिवशी संधि पाहून मीं काढली गोष्ट तिच्याजवळ. कुंदाहि होतीच माझ्या म्हणण्याला पाठिंबा द्यायला.

पण माझें बोलणें ऐकतांच कालिंदीने जें नाटक केलें आहेन् म्हणतां! आम्हांला तर "असलं भलतंच घाणेरडं विचारायला मी कोण वाटलें तुम्हाला?" असें फणकाऱ्याने उत्तर देऊन ती निघूनच गेली. पण येवढ्यानेच कुठे भागलें! संध्याकाळी नाना तावातावाने माझ्याकडे आले अन् काय वाटेल तें अभद्र तोंडसुख घेतलें त्यांनी माझ्यावर!

"दुसऱ्याच्या पोरींना अशा भलत्या मार्गाला लावण्याऐवजी आपल्या आयाबहिणींचा उद्धार करा की त्यांना दुसरा नवरा करून देऊन!" असें एक नी दोन!

त्यांच्या तोंडीं लागण्यांत अर्थ नव्हता तरी मी शांतपणाने म्हटलें, "नाना, माझी एखादी बहीण जर अशी असती तर तिचं मी आनंदानं लग्न करून दिलं असतं. फार काय, उद्या माझं जर एकाएकी बरंवाईट झालं तर मी कुंदेलासुद्धा हेंच सांगेन .."

माझ्या या बोलण्याचा त्यांच्यावर काय परिणाम होणार म्हणा! कुंदने मात्र माझ्याकडे डोळे वटारून पाहिलें.

आले तसे तणतणतच ते निघून गेले.

दुसऱ्या दिवशीपासून वाड्यांत माझ्याबद्दल वाटेल ती कुत्सित टीका ऐकूं येऊं लागली. समाजकार्य करूं गेल्यानें चांगलेच हात भाजले माझे!

असा हा सारा मागचा इतिहास होता. मग कालिंदीने पुन्हा लोचटपणानें आमच्याशी सलगी केल्याबद्दल आम्हांस राग आला तर काय नवल?

अन् पुढं कालिंदी एकाएकी घरांतून नाहीशी झाली! नाना अगदी हवालदील होऊन गेले. त्यानी अनेकपरीनी शोध केला. आप्तेष्टाना पत्रें अन् तारा केल्या. गावांतल्या स्नेहीसोबत्यांच्याकडे चौकशी केली. त्यांचा अन् आमचा अलीकडे अबोला होता तरीपण माझ्याकडे चौकशी केल्यावांचून ते राहिले नाहीत.

शिष्टाचार म्हणून मीं त्यांच्यावर आलेल्या प्रसंगाबद्दल सहानुभूति दाखविण्याचा मोठेपणा मिळवला; पण माझें दुष्ट मन म्हणालें, " बरी खाशी खोड मोडली!"

घरंदाज ब्राम्हण कुटुंबांतली तरुण विधवा मुलगी एकाएकी घरांतून नाहीशी झाल्याचें समजतांच लोकप्रवादाला कशी भरती येईल हें काय कोणाला सांगायला हवें? ज्याला जें वाटलें तें तर्कट त्याने रचलें.

इतकेंच नव्हे, तर माझ्याकडे पाहून नाक मुरडणाऱ्या लोकांनी या वेळी मुद्दाम माझ्याकडे येऊन, " अहो, आम्हांला ठाऊकच! त्या बयाचं लक्षणच तसलं! अन् काय पण कांगावा करून तुमच्यासारख्याचं नांव विनाकारण वाईट केलंन् हो!" असं म्हणून मला खूष करायलाहि कमी केलें नाही.

जग हें असें आहे खरें !

अन् खोटें कशाला सांगू ? स्वतःला मी इतर लोकांहून जास्त समंजस अन् विचारी म्हणवीत असल्यामुळे जरी त्यांच्या टवाळींत भाग घेत नव्हतों तरी ती ऐकतांना मात्र मलाहि मनांतून कसला तरी आनंद होत होता.

दुसऱ्या दिवशींच्या पोस्टाने माझ्या हातीं एक जाड पाकीट आलें. विस्मयाने मीं तें उघडलें. अक्षर माझ्या ओळखीचें नव्हतें. पण बायकी असावेंसें वाटलें. आश्चर्यानें मी वाचूं लागलों--

" अशोकदादा अन् कुंदाताई,

हें पत्र मीं लिहिलं आहे असं समजतांच न वाचतां रागानं तुम्ही फाडून टाकाल; पण कृपा करून तसं करूं नका येवढीच विनंती आहे माझी.

खरंच, किती प्रेमानं अन् आपुलकीनं वागलांत तुम्ही माझ्याशीं अशोकदादा ! तुम्ही दोघं माझ्या मनःस्थितीची कल्पना करूं शकलांत म्हणूनच त्या दिवशीं मीं विवाह करावा अशी कल्पना तुम्हीं सुचवलीत. त्याच वेळेला मनाशीं लपंडाव न करतां मीं तुमच्या विचाराला संमति दिली असती तर .. तर काय ! आज जो प्रसंग माझ्यावर आला आहे तो आला नसता. पण मला तें धैर्य झालं नाही अन् त्या दिवशींच्या त्या प्रकारानंतर तुम्हां उभयतांच्या एकुलत्या एक सहानुभूतीलाहि मी पारखी झालें.

स्वतःचा दांभिक सोवळेपणा दाखविण्यासाठी तुमच्या बोलण्याचा विपर्यास दाखवून मीं तुमची नाचक्की करविली. असं वाटून तुम्हांला माझा अत्यंत तिरस्कार वाटला असेल. पण अशोकदादा, तुम्हाला वाटतं त्याहून निराळं कारण माझ्या वर्तनाच्या बुडाशीं होतं असं मीं तुम्हांला सांगितलं तर तुम्हांला तें खरं वाटेल का ?

तुम्हांला हें समजावून सांगून तुमचा गैरसमज दूर करावा अन् तुमची क्षमा मागावी असं त्यानंतर किती वेळां मला वाटलं ! एकदोन वेळां

घरी येऊन तुमच्याशी बोलण्याचा मीं प्रयत्नदेखील केला; पण तुमच्या कठोर बोलण्यानं अन् तुटक वागण्यानं मला मेल्याहून मेलं होऊन गेलं अन् मी तशीच परत आलें.

अशोकदादा ! कुंदाताई ! तुम्ही माझ्या मनःस्थितीची कल्पना केलीत असं मी वर म्हटलं, पण तें पूर्णांशानं नव्हे. स्वतःच्या भावनांचा कोंडमारा करून समाजांतल्या ढोंगी नीतीला साजेलसं वर्तन ठेवतांना मनाची किती असह्य अन् विचित्र त्रेधा उडत असते. माझ्यासारख्या दुर्दैवी स्त्रियांची तुम्हांलाच काय, पण मोठ्या मानसशास्त्रज्ञाला देखील कल्पना येईल की नाही याची शंकाच आहे मला.

तुम्ही मला पुनर्विवाह करण्याविषयी सुचवलंत, त्या विशिष्ट क्षणी माझ्या मनाची किती विलक्षण त्रेधातिरपीट उडाली माहीत आहे तुम्हांला ? भावी आयुष्याचं एक रमणीय चित्र माझ्या डोळ्यांपुढं उभं राहिलं, नव्हे, त्या क्षणीं जणू कांही तें सुख माझ्या हातीं आलंच असं वाटून उंच उंच अंतराळांत भरारी मारली माझ्या मनानं-- पण किती ! एक क्षणभरच !

दुसऱ्याच क्षणी मी दचकलें, बावरलें, असंख्य कुत्सित डोळे माझ्याकडे उपहासानं, तिरस्कारानं बघताहेत असं मला वाटलं. टवाळीनं खो खो हसल्याचे आवाज माझ्या कानांत घुमू लागले अन् त्यांत ती आईची शरमेनं उतरून गेलेली चर्या अन् बाबांची क्रुद्ध नजर .. अग आई ग ! नको ! मला नाही पुनर्विवाह करायचा !

माझं मन अगदी पवित्र अन् शुद्ध आहे ! असला ‘ घाणेरडा ’ विचार माझ्या मनांत येईल तरी कसा ? समाजभयानं घाबरलेल्या माझ्या मनानं स्वतःच्या समाधानासाठी हा खोटाच आवेश निर्माण केला अन् त्याच आवेशांत मीं तुम्हांला तसं उत्तर दिलं. तेवढंच नव्हे, तर घरीं येऊन आईला, बाबांना सांगितलं अन् इतरहि मंडळींच्याजवळ तुमची निंदा केली मीं. तुम्हीं मला ही ‘ भलतीच ’ गोष्ट

कशी विचारलीत हें ज्याला त्याला रंगवून सांगून स्वतःच्या मनाच्या पवित्रपणाचं भरपूर प्रदर्शन केलं मी. येवढ्या पोरवयांतहि इतक्या विचारीपणानं, संयमानं आपलं मन ताब्यांत ठेवल्याबद्दल तोंडभर स्तुति केली साऱ्यांनी माझी अन् आर्य संस्कृतीचे पोवाडेहि गायिले. मुलीच्या अन् सुनेच्या बरोबरच स्वतःचाहि पाळणा वर्षाआड हालविणाऱ्या काकूमावशी अन् नातवंडं झाल्यावर म्हातारपणी जिवाभावाला असावी म्हणून नवी अल्पवयी बायको घरांत आणणारे काका, तात्याहि होते त्यांत!

पण एकाहि पुण्यात्म्यानं ' यांत वावगं कांहीच नाही. संसाराची भूक जशी आम्हाला आहे तशी तुलाहि असणारच. तूं उगीच मनाला न फसवतां नीट विचार कर अन् अनन्य अशोकरावांच्या म्हणण्याप्रमाणं पुन्हा लग्न कर ' असं प्रामाणिक मन दिलं नाही.

इथून तिथून सारं ढोंग! दांभिकपणा ' मलाहि त्या स्तुतीच्या कैफानं क्षणभर गुंगल्यासारखं होऊन मनाची भूक, हृदयाची आर्त हाक मी क्षणभर विसरलें, किंबहुना ती विसरावी—विसरलीच पाहिजे—म्हणूनच हें नाटक मी केलं नव्हतं का?

पण भाजलेल्या जागेवर फुंकर घातला तर ती आग थांबते थोडीच! शेवटीं व्हायचं तें झालंच.

समाजभयानं सुग्रास अन्नाचं ताट मी लोटून दिलं आणि चोरट्या अंधारांत जें हाती लागलं तें खातांना उष्टंमाष्टं नासकं याचा विचारहि केला नाही! येवढा विचार, येवढी जागरूकता होती कुठं त्या वेळी?

पण आता...केलेली चोरी उघडकीला येण्याची चिन्हं दिसताहेत! पोटी येणारं हें पाप नाहीसं करायचं असेल तर मलाहि त्याच्याबरोबर या जगांतनं नाहीसं व्हायला हवं. अन् या पापाचा माझा साथीदार कोण आहे तो माहीत आहे? ज्यानं तुमची नालस्ती करण्यांत मला भर

दिलीन् असा एक संभावित बोका ! पण त्याला कसली आली आहे भीति ! तो उजळ माथ्यानं उद्या माझीहि तशीच वाटेल ती टवाळी करील !

झाल्या प्रकाराचा खेद करूं नका. सारा समाज जोंवर असल्या दांभिक, कुजट वातावरणांत पिचतो आहे तोंवर तुमच्यासारख्या एकट्यादुकट्याच्या सदिच्छेला फळ कसं येणार ?

संपलं ! कधी काळी माझी आठवण कराल ती कालिंदी कपटी, ढोंगी म्हणून नव्हे, तर जगाच्या दांभिकतेला बळी पडलेली एक असहाय स्त्री म्हणून करा, येवढंच मागणं शेवटी मागायचं.

कालिंदी."



# गुदमरलेलं संगीत

दिवाणखान्यांत शिरण्यापूर्वी दिगंबरबुवांनी आपला डोक्याचा पांढरा जीर्ण रुमाल--जरीचा आहे असें मधल्या एखाद्या पट्टीवरून दिसत असलेला-- फिरून एकवार हाताने चापूनचोपून डोक्यावर बसवला, गळ्याभोवतालचें उपरणें जरासें सावरल्यासारखें केलें अन् आंत प्रवेश केला.

त्यांना पाहातांच आंतल्या मखमली कोचावर आळसाने रेलून पहुडलेल्या आक्कासाहेबांनी एक लांबलचक जांभई दिली अन् किंचित् सावरल्यासारखें करून त्या म्हणाल्या,

" आलांत बुवा ? बसा त्या खुर्चीवर. "

दबकत अन् आदबीने बुवा आक्कासाहेबांनी दाखविलेल्या खुर्चीवर बसले.

" तुम्हाला अशाकरिता बोलावणं पाठवलं बुवा, की आमच्या मनांतून पुन्हा गाण्याचा अन् पेटीचा अभ्यास करायचा आहे. तेव्हा म्हटलं, तुमचीच शिकवणी ठेवावी. बाबासाहेब म्हणत होते, ' कशाला पडतांय् या फंदांत ? आतापर्यंत थोडी का खटपट केली आहेत ? पण तुम्हाला कांही जमत नाही तें ! तुमची आवाजीच नाही चांगली.' बाबासाहेबांना काय समजतंय् यांतलं ? आमच्यासारखा आवाज हजारांत नाही सापडायचा. काय ? लहानपणी आम्ही शाळेंत असतांना तुम्हीच किती तारीफ करीत होतांत आमच्या आवाजाची. होय ना ? "

" हो तर ! खरंच आहे आक्कासाहेबाचं म्हणणं. पहाडी आवाज आहे आपला ! फार सुरेख, फार सुरेख ! " खुशामतीदाखल चेहऱ्यावर हास्य आणून दिगंबरबुवा उद्‌गारले.

" अहो, वर्गात साऱ्या विषयांप्रमाणं गाण्यांतहि पहिला नंबर असायचाच ना आमचा ! एकदा ती गंमत झालेली तुम्हाला आठवते का ? शाळेंत एक मोठा समारंभ झाला होता. गायनाच्या चढाओढी होत्या. त्या दिवशी परगावाहून आलेले कुठलेसे एक पाहुणे म्हणे गाण्यांतले तज्ञ म्हणून त्यांना परीक्षकांत नेमलं होतं. पहिल्या नंबरला चांदीचं पदक ठेवलं होतं बक्षीस ! सगळ्यांच्या आधी आम्ही कविता म्हटली. पण त्या आचरट गृहस्थाचं लक्षच नव्हतं तिकडे अन् शेवटीं जेव्हा त्या वंजाऱ्याच्या रखमीनं म्हटली तेव्हा आपलं पहिलं बक्षीस तिला द्यायचं म्हणून जाहीर केलंन्. अहाहा ! काय पण त्या रखमीचा अवतार ! फाटका परकर, विटकं पोलकं, ध्यान जसं कांही ! वर चढून अध्यक्षाच्या हातून बक्षीस घेतलेलं शोभलं तरी असतं का ? शेवटीं आमचे हेडमास्तर मधे पडले. त्यांनी आम्हाला पुन्हा ती कविता म्हणायला लावली अन् शेवटी आमचाच नंबर लागला. आमच्या भरजरी पातळावर तें पदक लटकावून आम्हीं ऐटींत अध्यक्षांना नमस्कार केला तेव्हा टाळ्यांचा केवढा प्रचंड कडकडाट झाला ! नाही आठवत तुम्हाला ? "

" वा वा ! हें काय विचारणं आक्कासाहेब, मी कधीतरी विसरेन का ती गोष्ट ? "

असें म्हणतांना पूर्वीसारखेंच लाचार हास्य चेहऱ्यावर दाखविण्याचा बुवांनी प्रयत्न केला; पण तो तितकासा साधला नाही. कसल्यातरी खेदकारक आठवणींनी विव्हळ झाल्यासारखी त्यांची चर्या भासली.

" तेव्हा म्हटलं दाखवावीच बाबासाहेबाना माझी करामत ! बाबासाहेब म्हणायला लागले, ' तुला शिकायचंच आहे तर मग त्या फडतूस दिग्याची कशाला ठेवतेस शिकवणी ? शेसव्वाशे पगार देऊन बाहेरचा एखादा नामांकित वस्ताद आणू शिकवायला. आपल्याला काय कमी आहे ? ' पण मी म्हटलं, 'बुवा कसे झाले तरी आपल्या इथले आमचे आश्रित नी लहानपणच मास्तर ! तेव्हा सुरवातीला तरी त्यांनाच ठेवू या. पुढंमागं आपल्याला वाटेल तेव्हा तुम्हाला बंद करून दुसरा शिक्षक ठेवायचं आपल्या हातांत आहे ' काय ! खरं की नाही ? "

" बरोबर आहे आपलं म्हणणं. आपल्या गावाचा अन् आपल्या जुन्या माणसाचा आपला अभिमान आपल्या थोर मनाला साजेसाच आहे. " बुवांनी पुन्हा एकदा मान हालवली. त्यासरशी जराशा खुशीत येऊन आक्कासाहेब बोलत्या झाल्या—

" आमचं हें असं आहे बुवा. आपल्या हातून होईल तितकं आपल्या माणसाचं बरं करायचं. उगीच नाही लोक स्तुति करीत आमची. "

" खरंच आहे तें. आज आक्कासाहेबांचं नांव सारीं माणसं घेताहेत ना ! फार दयाळु अन् उदार स्वभाव आपला. "

" बरं मग असं बघा, उद्यापासून या शिकवायला. पंधरा रुपये देत जाऊं तुम्हाला. आमचे जुने मास्तर आहां तुम्ही. थोडा अधिक

मेहनताना आम्ही खुशीनं देतों आहों तुम्हाला. बरं आहे, मग या उद्यापासून. ”

“ बरं आहे. ” असें म्हणून लवून नमस्कार करून दिगंबरबुवा बाहेर पडले.

घराकडे जातांना त्यांच्या डोक्यांत कितीतरी क्षोभकारक विचारांनी गर्दी केली होती !

दिगंबरबुवा तीन पिढ्यांपासूनचे पोकळपूर संस्थानचे रहिवासी. गोड आवाजाची त्यांच्या घराण्यांत निसर्गदत्तच देणगी होती. त्यांचे आजोबा भिक्षुकी करीत. जेवण्याच्या पंक्तीत त्यांनी आपल्या पल्लेदार आवाजांत एखादा श्लोक म्हटला की सारी पंगत डुलायला लागायची म्हणे !

त्यांचे वडीलहि तसेच. ‘ आरती म्हणावी अशी त्यांनीच ’ अशी त्यांची ख्याति होती.

लहानग्या दिगूचा आवाजहि भारी गोड होता. चारपांच वर्षांचा असल्यापासूनच कोणत्याहि उत्सव-समारंभांत ऐकलेल्या स्थानिक अगर अगर परस्थ गवयाच्या गाण्याची तो आपल्या बाळबुद्धिनुरूप बोबड्या स्वरांत नक्कल करून दाखवी अन् भोवतालच्या मंडळीची करमणूक करी.

पुढे सातव्या वर्षी मुंज होतांच त्याच्या गळ्यांत वडिलोपार्जित भिक्षुकीचं, पूजा अन् एकादष्ण्या करण्याचं काम यायचं.

पण त्याला ती गोष्ट मनापासून आवडत नसे. भटजी होण्याऐवजी आपण बुवा व्हावें अशी त्याची फार इच्छा. परंपरागत वृत्तीकडे असं दुर्लक्ष करण्याबद्दल वडिलांकडून रागें भरून घेऊन अन् प्रसंगीं चवदावं रत्नदेखील पाहिलें होतें त्यांनी.

पण अखेर त्यांनी आपलें म्हणणें खरं केलें. पोकळपूरच्या एका बुवासाहेबांकडून मोठ्या मिनतवारीने अन् अनेक दिवस त्यांच्या मनधरणीने त्यांनी थोडीशी गायनकला कंठगत केली.

सतराअटरा वर्षांचं वय असेल त्यांचं त्या वेळी. पण त्या तरुण जीवाची महत्त्वाकांक्षा फार दांडगी होती. बाहेरगावीं जाऊन आपण एखाद्या चांगल्या गवयाजवळ या कलेचं अधिक शिक्षण घ्यावें, गायनकलेंतलें अत्युच्च स्थान मिळवावें, मोठा नांवलौकिक कमवावा असें केवढें मनोराज्य होतं त्याचं ! पण मनांतले बेत कृतीत उतरायला पैशाचें पाठबळ लागतें, तें कुठे होतं त्याच्याजवळ ?

त्याच सुमाराला त्यांचे वडील अर्धांगवायूने आजारी पडले. संसाराचा सारा भार, बारातेरा भावंडें अन् स्वतःच्या दोन मुलांसुद्धा त्यांच्या अंगावर पडला अन् संगीतचूडामणि (!) होण्याची इच्छा करणारा दिगंबर आपल्या तुटपुंज्या ज्ञानावर संस्थानच्या शाळेंत वीस रुपयांवर गायन-मास्तरकी करूं लागला.

मनांतल्या मेलेल्या महत्त्वाकांक्षेच्या आठवणी त्यांना एखाद्या वेळीं येत. संस्थानच्या एका कुठल्याशा समारंभांत त्यांनी म्हटलेलें स्वागत-गीत ऐकून खूष झालेल्या दरबारच्या एका पाहुण्या खांसाहेबांनी " फार विलक्षण आवाजी आहे या मुलाची. चांगलं शिक्षण मिळालं तर बडा कसबी होईल अन् नांव काढील तुमच्या संस्थानचं ! " असे उद्‌गार काढलेले त्यांना आठवत.

खऱ्या मार्मिक कलावंताच्या तोंडचे असे प्रशंसोद्‌गार ऐकून आपली आधीच स्फुरण पावणारी महत्त्वाकांक्षा कशी चेतली गेली, थोडी-बहुत तरी मदत मिळावी म्हणून आपण ज्या बड्या घराण्याचे पिढीजात आश्रित त्या श्रीमंत सरदार बाबासाहेब माने यांच्याकडे याचना कशी केली अन् शर्यतीसाठी घोडे विकत घेण्याच्या अत्यंत महत्वाच्या उद्यो-गांत गढलेल्या श्रीमंतांना असल्या यःकश्चित् अर्जाचा विचार करायला सवड कशी झाली नाही, हेंहि त्यांना स्मरे.

अशा वेळी दीर्घ सुस्कारा सोडून दिगंबरबुवा म्हणत, " दरि-द्र्यांना कसली आली आहे महत्त्वाकांक्षा ? पखालीच्या बैलासारखा ओझें वाहतांनाच जायचा आता सारा जन्म ! "

पिळवटलेल्या हृदयांतून निघालेले रक्ताचे थेंब अश्रूंच्या रूपाने त्यांच्या डोळ्यांत चमकत.

मोठ्या लोकांच्या परिवारांत असायला लागणारी लाचार अन् हांजीहांजीखोर वृत्ति त्यांच्या स्वभावाला मानवण्यासारखी नव्हती.

गायनकलेच्या दरबारांतले ते एक सामान्य पायिक असले तरी तिचे एकनिष्ठ अन् प्रामाणिक अभिमानी होते ते.

पण मनाच्या या प्रामाणिकपणाची कदर न करतां तोंडपुजेपणा करण्याची पाळीहि त्यांच्यावर अनेकदा येई अन् त्या वेळी त्यांच्या सरळ, साध्या मनाला किती यातना होत !

बाबासाहेबांच्या कन्या श्रीमंत आक्कासाहेब ज्या वर्गात होत्या त्या वर्गाला शिकवण्याची त्यांना जेव्हा पाळी येई तेव्हा असाच असह्य संयम त्यांना करावा लागे. आक्कासाहेबांच्या बेसूर आवाजाचें 'सुंदर' पहाडी आवाज म्हणून कौतुक करतांना अन् इतर चांगल्या आवाजांच्या मुलींना मागे सारून त्यांच्या कर्कश कंठांतून सुरेल आवाज उमटवण्याचा निष्फळ प्रयत्न करतांना कित्येकदा त्यांना स्वतःचीच चीड येई !

त्याच वर्गात वंजारी जातीची एक मुलगी होती. रखमी तिचें नांव. तिची आई तिथे झाडलोट करीत असल्यामुळे पहिल्या वर्गात तिला फुकट प्रवेश मिळाला होता. तिच्या सुंदर फिरकीसारख्या आवाजामुळे दिगंबरबुवांना तिचें भारी कौतुक वाटायचें. पण तें व्यक्त करायची मात्र मुळीच सोय नसे. वर्गात एका कडेला बसायची बिचारी अन् एकदा सांगतांच स्वतः कंठगत केलेला गाण्याचा चरण पुनःपुन्हा सांगून आक्कासाहेबांच्या गळयांतून निघावा म्हणून यातायात करणाऱ्या बुवांकडे अधीर मनाने पाहात राही. तिच्याकडे पाहिलें की बुवांना फार वाईट वाटे. ते मनांत म्हणत, "ज्या कधीच पुऱ्या होणार नाहीत अशा महत्त्वाकांक्षा अन् जे कधीच जोपासले जाणार नाहीत असे

गुण देव गरिबांना देतो तरी कशाला? गरिबीचं दुःख काय कमी असतं म्हणून वर या आशाभंगाच्या यातना–?"

आपला सारा इतिहास त्यांना अशा वेळी आठवे अन् ते उदास होत.

पुढे रखमीच्या आईचें काम सुटलें अन् रखमी शाळेंत येईनाशी झाली. याहून तिची कांहीच अधिक माहिती त्यांना नव्हती.

तसेंच घरीच चांगला शिक्षक ठेवून शिक्षण घ्यावयाचें ठरविल्या-मुळे आक्कासाहेबांनीहि शाळा सोडली अन् दिगंबरबुवांचा संबंध कांही काळ सुटला.

आपल्या गावी अन् दूरच्याहि मोठमोठ्या शहरी राहून आपल्या आवडत्या गायनकलेचें शिक्षण घेण्यासाठी बरेच परिश्रम घेतलेले आक्का-साहेबांच्या नाजुक प्रकृतीला मानवले नाहीत. त्यामुळे मध्यंतरी बराच काळ त्यांनी विश्रांति घेतली अन् आता पुन्हा नव्या उमेदीने त्यांनी सुरवात केली होती.

आक्कासाहेबांना गाणें शिकवणें म्हणजे वाळूमधून तेल गाळण्याचा प्रयत्न आहे हें दिगंबरबुवांना समजत नव्हतं असें थोडेंच होतें? पण श्रीमंतांची इच्छा–हुकूमच म्हणाना तो–मोडणें त्यांना कसें शक्य होतें? शिवाय दरमहाच्या पंधरा रुपयांनी त्यांच्या गरिबीच्या संसारालाहि थोडी मदत होण्यासारखी होती.

आता रस्त्याने चालतांना हा सारा इतिहास त्यांना आठवला. आक्कासाहेबांच्या बोलण्यामुळे रखमीविषयीची त्यांची आठवणहि जागी झाली होती. त्यांच्या मनांत आलें, "कुठं बरं असेल ती गोड पोरगी आता? गाण्याचं अधिक शिक्षण घेतलं असेल का तिनं कुठं! हंः! किती वेडा विचार! बिचारीच्या सुरेल गळ्याचा मोलाचं दळण दळ-तांना ओव्या म्हणायला उपयोग होत असेल बहुतेक!" ह्या अन् अशाच खेदकारक विचारांशीं बराच वेळ चाळा चालला होता त्यांचा!

दुसऱ्या दिवशींपासून त्यांची शिकवणी सुरू झाली. ठरलेल्या वेळीं आक्कासाहेब आल्या आहेत शिकायला असं कधी झालें नाही. तासन् तास तेथे तिष्ठत बसावें लागे त्यांना ! बरें, आल्यावरहि संगीताची आपली आवड, त्यासाठी आपण केलेला अवाढव्य खर्च, त्यासाठी लागणारीं अनेक किंमतीची साधनें यांची माहिती सांगण्यांतच बराच वेळ जायचा !

आक्कासाहेब सांगत, "ही सतार पाहिलीत ! अगदी नंबर एकच्या बनावटीची आहे. दोनशे रुपये दिले आहेत हिला अन् महिना पाऊणशे रुपये देऊन त्या दाऊदखांला दोन वर्षं ठेवून घेतलं होतं शिकवायला. तशीच ही पेटी ! अस्सल माल आहे अगदी ! आठशे रुपये पडले आहेत. पण हीमुद्रा मला तितकीशी आवडत नाही म्हणून दुसरी एक नवीन मागवली आहे मी दीड हजाराची येईल थोड्याच दिवसांत. अन् हा दिलरुबा पाहिलांत– "

यावर मान हालवीत, "हं, ठीक ! वा, फारच छान !" अशी उत्तरें देत असले तरी बुवा मनाशी म्हणत –

" काय विचित्र तऱ्हा आहे समाजरचनेची ! या आक्कासाहेबासारखीं-- ज्यांच्याजवळ समाजांतला सारा पैसा एकत्र साठून राहिला आहे अशीं-- माणसं जो कधी सफल व्हायचा नाही अशा षोकापायीं हजारों रुपये निरर्थक मातीमोलानं उधळत आहेत; तर उलट ज्यांच्या अंगी कांही गुण आहेत त्यांना पैशाच्या अभावी त्यांची वाढ करतां न आल्यामुळें ते फुकट जाताहेत. एकूण काय, समाजांतली कर्तबगारी, बुद्धिमत्ता अन् पैसा या साऱ्यांचाहि निष्कारण नाश होतो आहे हा ! हजारो गरिबांना खायला पोटभर अन्न नाही अन् या श्रीमंतांसाठी मस्कतहून डाळिंबाची पार्सलं अन् विलायतेहून पाण्याच्या बाटल्या येत आहेत. गरीब लोक उघड्या अंगानं थंडींत कुडकुडत आहेत तर यांच्या कपाटांतून शेकडोगणती कपडे धूळ खात पडले आहेत ! छे ! शुद्ध अन्याय आहे हा ! साऱ्या गरीब लोकांनी मिळून एकजुटीनं या श्रीमं-

त्यांनी इतरांच्या तोंडाला पानं पुसून साठविलेल्या डबोल्यावर हल्ला केला पाहिजे अन् त्यांच्याजवळची साधनं लुटून घेऊन आपल्या गरजा भागविल्या पाहिजेत."

पण हे विचार मनांत येतात न येतात तोंच ते भानावर येत आणि आपल्या कर्तव्याची जाणीव होऊन घसा खाकरून सांगू लागत,

"सा, रे, ग, प, ध, साऽऽऽ"

एके दिवशीं असेच ते आक्कासाहेबांच्या आगमनाची वाट पाहात विचारमग्न स्थितींत बसले होते. आक्कासाहेबांचा नवा अस्सल फ्रेंच हार्मोनियम त्या दिवशींच आलेला असल्यामुळे नोकरमाणसांकडून त्याचें पॅकिंग सोडवून तो बाहेर काढण्याच्या नादांत होत्या त्या. इतक्यांत बुवा एकदम चमकले ! ते बसले होते त्या खिडकीखालून गाण्याचे मंजुळ स्वर ऐकूं आले. उठून खिडकींतून बाहेर डोकावून त्यांनी पाहिलें... एक भिकारीण गाणें गात होती. तिच्या कडेवर एक मूल अन् दुसरें पाठीला बांधलेलें होतें. तिच्याजवळचा एक पुरुष-- तो तिचा नवरा असेल कदाचित-- एका मोडक्या हातपेटीवर तिला साथ करीत होता.

बुवांना कांही शंका आली; म्हणून त्यांनी त्या भिकारणीकडे नीट निरखून पाहिलें--

होय, रखमीच होती ती ! तोच चेहरा अन् तोच ओळखीचा गोड आवाज ! आपल्या त्या मंजुळ आवाजाने ती म्हणत होती--

**" कान्हा, पदराला धरूं नको सोड ऽऽऽ "**

"अरेरे ! काय विपरीत परिस्थिति ही !"

बुवांचे डोळे पाण्याने भरून आले. उपरण्याच्या टोकाने ते पुसून अन् नेहमीच्या सवयीप्रमाणे घसा खाकरून ते परत जागेवर येऊन बसले. कारण आक्कासाहेब आलेल्या होत्या.

पुन्हा एकदा आवंढा गिळून त्यांनी सुरवात केली-- "सा रे ग म प ध नी सा ऽ ऽ."



# साळू

पौष महिन्याचे दिवस होते ते. पांच वाजले होते. अद्याप पुरतें उजाडलें नव्हतें. बाहेर थंडीचा कोण कडका पडला होता! पांघरुणांतून तोंड काढायची कांही सोय नव्हती.

साळू तशा भल्या पहाटे जागी झाली. तिला आताच उठायला हवें होतें. अंगावरली जीर्ण वाकळ तिने जराशी बाजूला सारली आणि कुशींतल्या तान्हया पोराला हळुवारपणाने जरा बाजूला सारलें.

पण आओच्या कुशीची ऊब नाहीशी होतांच तें अर्भक जागें होऊन मोठयाने रडूं लागलें.

उठण्याच्या बेतांत असलेली साळू पुन्हा त्याच्या शेजारीं आडवी झाली आणि त्याचें रडें बंद करण्यासाठी तिने त्याला स्तनपान करण्यासाठी पुढयांत घेतलें.

मिटलेल्या डोळ्यांनी तें बालक मातेच्या त्या कृश, काळजीने आणि दारिद्र्याने खंगलेल्या हृदयांतून मिळेल तेवढा दुधाचा थेंबन् थेंब शोषून घेण्याचा प्रयत्न करीत होतें.

पण इकडे साळूचा जीव खालीवर होत होता.

क्षणाक्षणाने दिवस वर येत होता. खोलीतला अंधार उजळून जरासें अंधुक दिसूं लागलें होतें.

साळूने आपली दृष्टि खोलींतल्या दुबळ्या संसारावरून फिरविली. एका कोपऱ्यांत चूल होती, तिच्यापुढे राखेचा ढीग तसाच पडला होता, आणि जवळच काल रात्रीं अकरा वाजतां झुकत झुकत घरी आल्यावर धोंडीबाने– तिच्या नवऱ्याने– भाकर खाल्ली होती ती थाळी अजून तशीच पडली होती.

पलीकडच्या कोपऱ्यांत दोन हंडीं-मडकी होती. मधल्या दोरी-वर चार लक्तरें लोंबत होतीं. भिंतीच्या एकुलत्या एक मोडक्या खुटीवर धोंडीबाचें मुडासें-कुडतें टांगलें होतें. बस्स, संपला सारा संसार!

पांचसात मिनिटें झाली तरी तान्हयाची भूक संपण्याचें कांही लक्षण दिसेना; तेव्हा निष्ठुरपणें तिने त्याच्या तोंडांतून पान्हा काढून घेतला आणि त्याच्या अंगावर पांघरूण घालून त्याच्या रडण्याकडे लक्ष न देतांच ती उठली.

काय करील बिचारी! सभोवार कामाचा पसारा पडलेला होता. भांडीं घासून पाणी भरून तिला भाकरी-कालवण करायला हवें होतें; आणि सारें काम आटोपून उजाडण्यापूर्वी कामाला जायचें होतें.

तांब्यांतल्या पाण्याने चूळ भरून तिने ते ओले हात डोळयांवरून फिरवले, चुलीपुढील राख भरली अन् भांडी घासण्यासाठी ती बाहेर चाळींतल्या नळावर आली.

पहाटेचा गार वारा अंगाला झोंबत होता. थंडीने दातखिळी वाजत होती. हात गारठून गेले होते.

नळावर चाळींतल्या तिच्यासारख्या इतर बायकांची गर्दी झाली होती. त्यांच्यांतून प्रवेश मिळवून तिने पाणी भरलें, चुलीला विस्तव घातला अन् भाकरी करायला सुरवात केली.

तेवढयांत धोंडीबा जागा होऊन कामावर जाण्याच्या तयारीला लागला होता. तोंड धुऊन खुटीवरचें कुडतें त्यानें अंगांत चढविलें, खिशांतील एक विडी चुलीच्या विस्तवावर शिलगावून तो चुलीपाशी शेकत बसला आणि बायकोशी गोष्टी करूं लागला.

रात्रीची नशा अजून पुरती उतरली नसल्याचें त्याच्या लाल आणि तारवटलेल्या डोळ्यांवरून दिसत होतें.

साळूहून तो वयानें बराच मोठा होता. त्याच्या डोकीचे आणि वाढलेल्या दाढीचे केस पांढरे झाले होते.

बोलतांबोलतां त्याने विडीचा एक भला मोठा दम मारला; त्यासरशी त्याला खोकल्याची उबळ आली. किती वेळ ती कांही केल्या थांबेना ! शेवटीं तर तो अगदी घामाघूम झाला.

पिठाने भरलेल्या हातांनी भाकरी करण्याचें काम तसेंच अर्धवट थांबवून साळू त्याच्याकडे पाहात होती. त्याच्या खोकल्याबरोबर तिचा जीव वरखाली होत होता. शेवटी तर तिने हातांत अर्धवट बनवलेली भाकरी पितळींत टाकली आणि त्याच्याजवळ जाऊन ती त्याच्या पाठीवरून हात फिरवू लागली.

जरा वेळाने त्याची ढास थांबली. साळूने पुढे केलेल्या तांब्यांतून दोन घोट पाणी पिऊन तो बराच हुषार झाला.

“ लयीच झालाय् खोकला आतासा ! एकाद्या वैदाला तरी दावलं पाहिजे. ” काळजीच्या स्वरांत साळू म्हणाली.

“ येडी कुठली ! अग, आपल्या गरिबास्नी कुठलं वैद न दाकदार ? व्हईल तवा व्हईल बरं ! ”

साळूने एक निःश्वास सोडला. धोंडीबाचें म्हणणें खोटें थोडेंच होतं! गिरणींत त्याला पंधरा रुपये पगार होता; पण खाडेतोडे, दंड वगैरे वजा जाऊन बाराएक रुपये त्याच्या हातीं पडत. आणि ते तरी काय सरळ घरी येत थोडेच! गेल्या महिन्यांत करून ठेवलेली पानविडीची उधारी व गिरणीच्या फाटकाशीच व्याजवसुलीला आलेल्या पठाणाचें देणें देऊन बाहेर आल्यावर धोंडीबाचीं पावलें दारूच्या गुत्त्याकडे वळत आणि त्या दिवशी अपरात्रीं जेव्हा त्याची स्वारी घराकडे परत येई तेव्हा त्याच्या खिशांत सातआठ रुपये मिळाले तरी साळू तें आपलें भाग्य समजे!

नवऱ्याच्या या व्यसनाधीनतेबद्दल साळू पुष्कळदा त्याची कान-उघाडणी करी. आणि धोंडीबाहि अनेकवेळां तिच्या "गळयाची आन" वाहून पुन्हा दारूला स्पर्श न करण्याचा निश्चय करी. पण दारू-बाजाचा निश्चय नेहमीच दारूच्या ओघांत वाहून जात असतो.

एरवी धोंडीबा तसा स्वभावाने कांही वाईट नव्हता. आपल्या घर-धनिणीबद्दल त्याला अभिमान आणि प्रेमहि वाटे. पण तो पुरुष होता. अपुरी मिळकत, कुटुंबाची ओढाताण या गोष्टी दिसत असूनहि महिना दोनचार रुपये काडीबिडी, चहा-दारू यांत खर्च करणें यांत त्याला गैरवाजवी असें कांही वाटत नसे.

पण साळू...ती स्त्री होती. बाहेर पैसे मिळविण्यासाठी कष्ट करून पुन्हा ती घरकामाचा गाडा ओढी. स्वतःच्या जिवाची कसली चैन तर राहोच; पण तिच्या मालकीणबाईंनी कधी काळीं उदार होऊन तिला एखादा खाण्याचा जिन्नस दिला तर आपल्या पोराबाळांसाठी व नवऱ्यासाठी ती तो जपून घरीं आणी. काटकसरीने रुपाया आठ आणे शिल्लक पडली तर आपलें लुगडें फाटलें असतांनाहि धोंडीबाला आग्रह करून पैरण शिवायला लावी.

आताशा त्याची प्रकृति बरी नव्हती. त्याला मधूनमधून ताप येई. खोकला तर कायमचाच ठाणें देऊन बसला होता!

साळू त्याला औषध घेण्याविषयी सांगू लागली की तो वरील सारखं उत्तर देऊन तिला गप्प करी. पण साळूची काळजी त्यामुळे थोडीच दूर होणार होती? शेजारचा तो विठूजी केवढा दांडगा गडी; पण असाच खोकला, ताप लागून वर्षभर अंथरुणाला खिळला व झिजून मेला! आणि तो गोविंदा... खोकतांखोकतां त्याला रक्ताची गुळणी आली व एकदम गप्प झाला! असली सारी उदाहरणें आठवलीं की तिचें काळीज चर्रर्र होई आणि चार घटका तिला कांही सुचत नसे.

आताहि ती अशीच सचिंत बसलेली होती, ती धोंडीबाच्या बोलण्याने भानावर आली.

"चल चल, आटप लौकर, भाकर बांधून दे. आता होईल बघ भोंगा."

"ही झालीच बघा. येवढी मिरची खरडतं अन् देत्येंच बांधून."

घाईघाईने तिने चटणी वाटली, धोंडीबाला भाकर बांधून दिली. तिची दुसरी दोन मुलें उठली होती त्यांच्या पुढयांत भाकर वाढून थाळी सरकवली आणि त्यांना आपण परत येईपर्यंत भांडगतंटा न करण्याबद्दल बजावून ती कामावर जायला निघाली.

उंबरठयांत तिला कसलीशी आठवण होऊन ती मागे फिरली. समोरच्या कोनाडयांत चिंधींत बांधलेली एक लहानशी जस्ती डबी होती त्यांतून लहानशी अफूची गोळी काढून घेऊन तिने ती अंथरुणांतच किरकिरत असलेल्या मुलाच्या तोंडांत घातली. थोरल्या सहासात वर्षांच्या मुलीला बाळाकडे लक्ष देण्यास अन् त्याला दूध पाजण्यास पुन्हा एकदा बजावून सांगितलें अन् ती बाहेर पडली.

सूर्य उगवला होता; पण रस्त्याच्या कडेच्या उंचउंच इमारतींच्या आडून त्याचं दर्शन होत नव्हतं. रस्त्यांत चांगला गारठा होता. अंगावरील जीर्ण वस्त्राचा पदर पाठीवरून अंगावर घट्ट लपेटून घेण्याचा

साळूने प्रयत्न केला. पण त्याने थंडी तर थांबली नाहीच; उलट चर्रर आवाज करून तें फाटलें मात्र

रस्त्यांत फारशी रहदारी नव्हती. होते ते धोंडीबासारखे गिरणीकडे धावणारे मजूर अन् मधूनच धावणाऱ्या मोटारी.

बाळासाहेब दशपुत्र्यांच्या बंगल्यांत ती येऊन पोंचली तेव्हा साताचे टोके पडलेले तिने ऐकले. माडीवर अद्याप सामसूम होती. ब्राम्हणाने खालचें दार उघडून चुलीत विस्तव घातलेला दिसत होता.

लगबगीने तिने बंब पेटविला बाळासाहेब, बाईसाहेब उठण्याच्या आंत तोंड धुण्याचें पाणी तापायला हवें होतें. आणि ती अंगणांतला केर काढू लागली.

इतक्यांत बाईसाहेब जिना उतरून खाली आलेल्या तिने पाहिल्या.

"अजून अंगणांतला केर निघाला नाही ना? शर्थ आहे बाई तुझ्या काम करण्याची! बंब तरी तापला आहे का? का तोहि नाही?" न्हाणीघरांत जातांना त्यांनी ताशेरा झाडला! हात पुसायचा टॉवेल बदलून न ठेवण्याबद्दलहि एकदा तिला बोलून घ्यावें लागलेंच.

केर काढून साळूने अंगणांत सडा घातला, मधल्या चौकांतली फरशी धुऊन काढली आणि माडीवरची अंथरुणें काढायला ती गेली.

पांढऱ्यास्वच्छ चादरी, मऊमऊ झालरीच्या अभ्र्यांच्या उशा, प्रशस्त गाद्या, काश्मिरी शाली, विलायती ऊबदार रग — गरिबाला असल्या कापडांचा स्पर्श अंथरुणें काढतांनाच काय तो व्हायचा!

शेवटची गादी झटकतांना खट्कन् कायसं वाजलें. साळूने पाहिलें ..लहानग्या लीलाताईच्या हातांतली चिमुकली आंगठी! परवा मुक्ताच वाढदिवस झाला तेव्हा बाईसाहेबांनी ती हौसेने करून आणली होती. झोपेंत उचकटून ती गळून पडली असावी.

साळूने ती एकवार हातांत घेऊन निरखून पाहिली. दोनचार क्षण गोंधळल्यासारखी होऊन ती उभी राहिली. पुन्हा कांहीएक विचार मनांत आल्याप्रमाणे ती झटकन अर्धा जिना उतरली आणि शेवटी तिला काय वाटलें कोणास ठाऊक, तिने पटकन् ती आंगठी पोटकळीस लावली आणि ती वर येऊन माडीचा केर काढू लागली

साळू हाडाची लबाड नव्हती. गेली तीन वर्षे तिने दरमहा सात रुपयांवारी इमानाने दशपुत्र्यांचें काम केलें होतें. एकदा बाईसाहेब कुठेशा बाहेर जातांना तिजोरीच्या किल्ल्या विसरल्या होत्या अन् त्या साळूला सापडल्या, तिने त्या नीट उचलून ठेवून बाईसाहेबांना दिल्या. हिऱ्याच्या कुड्या तर न्हाणीतच जायच्या; पण साळूचें लक्ष गेलें म्हणून सापडल्या. अशा एक ना दोन, कितीतरी गोष्टी...

साळूचा कष्टाळू बिनबोलका स्वभाव आणि कामांतली तिची स्वच्छता अन् नीटनेटकेपणा जसजसा बाईसाहेबांच्या नजरेस येत चालला तसतशी त्या तिच्या अंगावर जास्तजास्त कामें टाकूं लागल्या. परटाकड जाणारे बरेच कपडे आता साळूच्याच वांट्याला धुवायला येत. बागेला पाणी घालणारा आणि छोट्या सुरेशला संभाळणारा छोकरा कामचुकार आहे म्हणून बाईसाहेबांनी काढून टाकला आणि तें कामहि साळूकडेच आलें.

पण काम वाढलें म्हणून पगार मात्र वाढला नाही ! एकदोनदा साळूने हळूच तसें सुचवून पाहिलें; पण बाईसाहेबांनी त्यावर हवें तितकें तोंड सोडलें.

"अगबाई ! सात रुपये थोडे का झाले वरकामाला ? या गावांत दुसरें कोण पांच रुपये तरी देतात का बघ ! बघ बाई पटलं तर राहा, नाहीतर आम्ही दुसरी बाई बघू !"

बाईसाहेबांची ही दर्पोक्ति सकारणच होती.

माणसाच्या मेहनतीच्या प्रमाणांत जर मोबदला मिळत असता तर दिवसाकाठीं इकडची काडी तिकडे न करणाऱ्या बाईसाहेबांना पाटा-

वरून पलंगावर आणि खुर्चीवरून कोचावर लोळण्याची शक्यता कशी होती ? आणि पाहाटेपासून रात्रीपर्यंत उसंत न घेतां कष्ट करणाऱ्या साळूला चिंध्यांनी शरीर झाकायची पाळी कां येती ?

स्वतःच्या श्रमांची किंमत ठरविण्याचा हक्क आज श्रमिकाला कुठे आहे ? त्यांचे श्रम विकत घेणारे बाजारांत ठरवतील तें त्याचें मोल !

आज दारिद्र्य आणि बेकारी यांच्या आचेने होरपळत असलेल्या कितीतरी साळू आपले शरीरकष्ट येईल त्या मोलाने विकायला तयार असतांना साळूच्या मेहनतीला भाव कसा यावा ?

तेव्हा सांगायची गोष्ट अशी, की साळूचा पगार कांही चढला नाही !

भांडी घासतांना बेबीताई-भय्यासाहेबांनी ताटांत नास करून टाकलेली तूपसाखर, लोणी, दही पाहून मिरच्यांबरोबर पाण्याच्या घोटाशी भाकर गिळणाऱ्या आपल्या मुलांची तिला आठवण येई. तिच्या दोन्ही मुलांना गोवर येऊन गेला होता नुकताच. शेजारपाजारच्या म्हाताऱ्या बायका म्हणत, त्यांच्या पोटांत आग पडली आहे, कांहीतरी थंड... दूधतूप खायला पाहिजे. पण दुधातुपाच्या विहिरी थोड्याच आहेत ?

आज अंथरुणांत ती आंगठी पाहातांच साळूचें मन बावचळलें तें यामुळेच. तिच्या नजरेसमोर घरधन्याची खोकून व्याकुळ झालेली चर्या उभी राहिली. गंगी आणि विठ्या यांची गालफडें बसलेलीं आणि पोटाच्या फासळ्या दिसणारी शरिरें दिसूं लागली आणि... आणि...मोहाचा जय झाला !

त्या दिवशीं सारा दिवस साळूचें कामावर चित्त नव्हतें. बाई-साहेबांनी नेहमीप्रमाणेच ‘ साळू ’ अशी दरडावून हाक मारली की तिला वाटे, या आपल्याला आंगठीबद्दलच कांहीतरी विचारणार. पुनःपुन्हा तिचा हात पोटकुळीला जाई. तीनतीनदा तिच्या मनांत येई– “ जाऊं दे. देऊन टाकावी एकदा ! आपल्याला चैन पडणार नाही त्याशिवाय ! ”

पण जसजसा वेळ जाऊं लागला तसतसा तो विचार तिने सोडून दिला. सकाळी सापडलेली आंगठी एवढा वेळ ठेवून घेऊन आता परत करण्यांत पदरीं मूर्खपणा मात्र यायचा !

दुपारपर्यंत आंगठीची गोष्ट कोणाच्याच लक्षांत न आलेली पाहून तर ती चांगलीच निर्धास्त झाली.

पण अखेर होऊं नये तें झालेंच.

चहाच्या वेळी बाईसाहेब कशावरून तरी संतापलेल्या होत्या; तेवढयांत त्यांच्या कपबशा उचलून नेण्यासाठी साळू तेथे आली आणि खाली वाकली तोंच... कशी कोण जाणे, तिच्या पोटकुळीची ती आंगठी निसटून त्यांच्या पुढयांत पडली !

आणि मग काय झालें असेल तें काय सांगायला पाहिजे ?

बाईसाहेबांची सारी पुष्पांजलि खालच्या मानेने ऐकून घेत साळू मुकाटयाने उभी होती. आंगठी चोरल्याबद्दल तर त्यांनी साळूला शिव्या देऊन घेतल्याच, पण नेहमीच ती असा हाताळपणा करते, पीठ-मिठापासून चांदीसोन्यापर्यंत जें सापडेल तें लांबवायला सोडीत नाही, असा बिनदिक्कतपणें तिच्यावर आरोप केला !

“ उभी कशाला राहिलीस आता माझ्यासमोर ? जा, चालती हो ! पुरे तुझं काम आम्हांला ! सारं घर नेशील धुऊन बघतां बघतां ! ”

बाईसाहेबांचा एकेक शब्द साळूच्या जिव्हारीं जाऊन पोंचत होता. आंतल्या आंत अपमानाने, लज्जेने तिचं अंतःकरण जळत होतें.

पण बोलायला तिला तोंड कुठे होतें ? आजवरची सारी अब्रु क्षणभराच्या मोहाने तिने दवडून टाकली होती !

आपण जायला सांगूनहि ती हालत नाही हें पाहून बाईसाहेब अधिकच संतापल्या !

" उभी काय राहिलीस लोचटासारखी ! चल नीघ ! पुन्हा पायरी चढू नको माझ्या घराची ! "

बाईसाहेबांची विनवणी करून कांही उपयोग नाही हें साळू जाणून होती आणि याचना करण्याच्या मनःस्थितींत ती नव्हतीहि. पण ती घुटमळत होती त्याचें कारण निराळेंच होतें.

ती महिन्याची एकोणतीस तारीख होती. साळूचा पगार बाई-साहेबांच्याकडे होता ना ! पण सध्याच्या अपमानित स्थितींत तो माग-ण्याचें धैर्यहि तिच्या जिभेला नव्हतें !

म्हणून ती अशी घुटमळत होती. अखेर बाईसाहेबांनी तिच्या दंडाला हात घातला...

मोठा हिय्या करून साळू म्हणाली,

" माझा पगार..."

" अस्सं ! चोरी करून वर पगार मागतेस होय ? पोलिसच्या स्वाधीन केली म्हणजे मग समजेल ! चल नीघ बऱ्या बोलानं ! का पाठवूं भिकूला चौकीवर ? "

डोळ्यांनी आसवं गाळीत साळू घराकडे परतली. तिचं मन विचार-शून्य झालें होतें. पायांतलें अवसान जाऊन ते भेंडाळल्यासारखे झाले होते. कशींबशीं पावलें टाकीत ती घरी येऊन पोचली.

तिला पाहून अंगणांतल्या मातीत खेळणारीं तिची दोन्ही मुलें तिच्याकडे धावत आली.

" आज लौकर कशी आलीस तूं आई ? " तीं विचारूं लागली.

" आई, आम्हीं भांडाभांडी केली नाही बरं का. अन् मीं बाळाला दूध पन पाजलं. "

" अन् मीं पांघरुनाच्या घडया करून टेवल्या. "

तीं चिमणी पाखरें आओीभोवती असा किलबिलाट करीत होतीं; पण त्यांना जवळ घेऊन नेहमीप्रमाणे कौतुक करण्याच्या मन:स्थितींत साळू कुठे होती ?

" जिवाला गोड वाटत न्हायी व्हय् ? " तिला अशी उदास अन् मुकस्तंभ बसलेली पाहून तिची मुलगी तिला विचारूं लागली.

पोरांच्या त्या निष्पाप दीनवाण्या तोंडाकडे पाहून तिला भडभडून येत होतें. परवा पहिली तारीख. मागचें देणें दिल्याशिवाय दुकानदार पुढे माल कसा देईल ? घरांतलें पीटमीठ तर आजच सरून गेलें होतें. सारा दिवस ती रडरड रडली. अन्नाच्या कणालाहि तिने स्पर्श केला नाही.

संध्याकाळी घरी आल्यावर धोंडीबाने देखील तिला खोदखोदून विचारलें. पण " काम सुटलं " यापलीकडे त्याला तरी ती घडलेली हकीकत कोणत्या तोंडाने सांगणार ?

दोन महिने वणवण फिरून साळूला एक नवें काम लागलें होतें. तिची ही नवी मालकीण स्वभावाने चांगली होती. कामाला लागल्याच्या आठव्याच दिवशीं तिने साळूला एक जुनें लुगडें दिलें. घरांत कांही गोडधोड झालें की साळूला मुलांसाठी वाढून द्यायला ती विसरत नसे. साळूची खिन्न मुखचर्या पुन्हा टवटवीत दिसूं लागली. मालकिणीची मर्जी राखण्याचा ती मनापासून प्रयत्न करी. मालकिणीला आवड म्हणून तिने घरापुढल्या बागेची साफसफाई केली, झाडांना अळीं केली, वेलांना कामट्यांचे मांडव घातले, अंगण आरशासारखें तुळतुळीत केलें. कोठीघरांतली अडगळ काढून नीटनेटकी लावली. डाळतांदूळ निवडायची, पीठकूट दळायची बोली नसतांना देखील आपण होऊन तत्परतेने ती कामें करी.

दोन महिने असेच गेले.

त्या दिवशी मालकीणबाईकडे चहाला कोणी बडे पाहुणे यायचे होते. साळूने सारी तयारी केली. गादीला, लोडाला नवे स्वच्छ अभ्रे

घातले, तिने हौसेने निगा राखलेल्या बागेतून सुरेख फुलें तोडून आणून फुलदाणींत ठेवलीं. अंगणांत नी दर्शनी भागांतल्या कुंड्यांवर पाणी मारून जिकडेतिकडे गारेगार करून टाकलें! नव्या कपबशा, ट्रे घासून-पुसून लख्ख करून दिला.

चार वाजले आणि पाहुण्यांची मोटार दारांत येऊन उभी राहिली. साळू कौतुकाने व उत्कंठेने पाहात बाजूला उभीच होती.

शोफरने खाली उतरून दार उघडून दिलें व दारांतून आपल्या रेशमी लुगड्याचा पदर सावरीत बाईसाहेब बाहेर पडल्या.

साळूचा चेहरा एकदम उतरला! ती तिथून निघून जाणार होती; पण तेवढ्यांत बाईसाहेबांची तीव्र नजर तिच्यावर गेलीच व आपल्या स्वागतासाठी पुढे आलेल्या घरधनिणीला त्यांनी मोठ्या ठसक्यांत म्हटलें,

"हं! ही बया तुमच्या इथं राहिली का कामाला?"

मालकीणबाईंनी त्या उद्‌गारांसरशी चमकून साळूकडे पाहिलें; पण ती तेवढ्यांत झटकन् आंत निघून गेली.

चहापान मोठ्या रंगांत आलें होतें. मोठमोठ्याने बोलण्याचा व हसण्याखिदळण्याचा अस्पष्ट आवाज साळूला मागील दारीं ऐकूं येत होता. मध्येच स्वयंपाकीणबाईंनी तिला कशालाशी हाक मारली; पण साळू कांही उठली नाही.

तास दीड तासाने मोटार निघून गेली. मालकीणबाईंचा आवाज ऐकूं आला, "साळू, ए साळू–" चारपांच हाका मारल्यावर साळू बाहेर आली. तिचें तोंड काळवंडून गेलें होतें.

"साळू!" तिच्याकडे पाहात गंभीरपणाने मालकीणबाईंनी विचारलें.

"तूं पूर्वी दशपुत्र्यांच्याकडे कामाला होतीस वाटतं?"

"व्हय..." गुदमरल्यासारख्या आवाजांत साळू म्हणाली. मालकीणबाई पुढे काय सांगणार तें तिला कळून चुकलें.

पुन्हा बेकारी, पुन्हा उपासमार, पोटच्या गोळ्यांची देखतांडोळां होणारी दुर्दशा-- साळूला ब्रम्हांड आठवलें! पटकन् पुढे होऊन तिने मालकिणीचे पाय धरले आणि ती गद्गद् स्वरांत म्हणाली,

" वहिनीसाब, कंदी न्हवं ती एकदा चूक झाली माझ्या हातून; पर कानाला खडा लावून घेतलाय् तवापून या जिवानं. वैनीसाब, पाठीवर मारा पर पोटावर मारूं नका माऊ्या--- "

तिच्या दोन्ही दंडांना धरून उठवीत वैनीसाहेब म्हणाल्या, " अग, असं काय करतेस? म्हटलंय् का मी तुला...? "

" कामावरून काढू नका मला. माझ्या पोराबाळांच्या तोंडचा घास... "

" चल वेडपट कुठली! ते डोळे पूस पाहूं आधी. कुणीं सांगितलं तुला मीं कामावरून काढतें म्हणून? खुळी नाहीतर! तुझ्या त्या दशपुत्रेबाईसाहेबांनी सांगितली मला सारी हकीकत. पण तेवढ्यानं तुझ्याबद्दल गैरसमज करून घ्यायला मी कांही वेडी नाही. अग, आजच्या समाजांत चोरी करीत नाही कोण? हसायची चोरी, मोकळेपणानं बोलायची चोरी, सारा चोरीचाच मामला आहे आजकाल! हवं असलेलं न्याय्य मार्गानं राजरोस मिळालं नाही म्हणजे चोरीची बुद्धि झाली तर नवल काय? ज्याची चोरी उघडकीला येते तो चोर ठरतो अन् जो राजरोस कायदेशीरपणानं चोरी करतो तो संभावीत, शिष्ट समजला जातो! ते दशपुत्रे इन्स्पेक्टर आहेत ते बाजाराचे, घरीं येणारीं फळांचीं पार्सलं, सुक्या मेव्याचे पुडे अन् पाकिटांतून नोटा-- ही चोरीच की! पण ती शहाजोग! बरं, पण जाऊं दे तें. तूं आधी डोळे पूस, तोंड धू, चहा घे जा. अन् शिरा-पोहे काय उरलं असेल तें घेऊन जा घरीं मुलांना. "

साळू कांही बोलली नाही. खुदकन् हसली मात्र.

तिच्या डोळ्यांत कृतज्ञतेचे अश्रू चमकत होते.

● ● ●